# अंतर्ज्ञान खरें असतें काय ?

लेखक

**वासुदेव लक्ष्मण चिपळोणकर (पुणें)**

'सिद्ध पुरुष व त्यांचा संप्रदाय', 'महंमद पैगंबर व त्यांचा इस्लाम धर्म'
'जीवनाचा हेतु', 'थिऑसफींत नवीन काय आहे?'
'श्रद्धा की चिकित्सा' इत्यादि पुस्तकांचे कर्ते

व

**राजाराम सखाराम भागवत (ठाणें)**

'सिद्ध पुरुष व त्यांचा संप्रदाय', 'हिंदु सामुदायिक पूजा' 'मृत्यूनंतर काय?'
'ईश्वर आहे काय?' 'थिऑसफी म्हणजे काय' 'थिऑसफींत नवीन
काय आहे?' 'बेझंट चरित्र' 'राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास'
'मृत्यू व मृत्यूनंतर' 'महाराष्ट्रांतील संत व त्यांचे
साक्षात्कार' 'ईश्वर आहे कीं नाहीं?' 'आपण
पुनः पुन्हां जन्मास येतों काय' वगैरे ग्रंथांचे
कर्ते व मराठी थिऑसफिकल
फेडरेशनचे अध्यक्ष



**किंमत दीड रुपया**

# प्रस्तावना

धर्म म्हणजे काय? या प्रश्नाला एक नवीन प्रकारचें उत्तर देण्याकरितां हें पुस्तक आम्ही महाराष्ट्रीय वाचकांसमोर ठेवीत आहों.

जगांत अनेक धर्म आहेत. प्रत्येक धर्मांत अनेक चालीरीती असतात आणि वेडगळ समजुतीही असतात. या चालीरीतींना व वेडगळ समजुतींनाही सामान्य लोक 'धर्म' म्हणून म्हणतात. प्रत्येक धर्मांत हा जो चालीरीतींचा व भ्रामक समजुतींचा भाग आहे तो वेगळा काढला तर त्यांत ज्ञानाचाही कांहीं भाग शिल्लक असलेला दिसून येतो. उदाहरणार्थ, हिंदुधर्मांत असा ज्ञानाचा भाग असून तो भगवद्गीता, उपनिषदें वगैरे ग्रंथांत दिलेला आढळतो. मृत्यूनंतर माणसाचा जीव शिल्लक रहातो, माणूस पुनः पुन्हां जन्मास येतो, माणसाची उन्नति होतहोत परिणामीं तो ईश्वरासमान बनतो, सृष्टीचें रहाटगाडगें फिरविणारा ईश्वर नांवाचा एक सूत्रधार सृष्टीच्या पाठीशीं आहे, माणसानें दुसऱ्यास दुःख दिलें तर त्याच्या वाट्यास दुःख येतें, सुख दिलें तर सुख येतें, सृष्टींत अदृश्य असे अनेक लोक आहेत वगैरे विधानें हिंदुधर्माच्या आकर ग्रंथांत आढळतात. हा ज्ञानाचा भाग आहे. पुष्कळदां आपण या गोष्टींना 'सिद्धांत' म्हणतों

पण सिद्धांत म्हणजे काय ? हिंदुधर्मांत पुनर्जन्माचा 'सिद्धांत' आहे असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां सिद्धांत शब्दाचा आपला अर्थ काय असतो ? सिद्धांत म्हणजे 'मत' होय असें पुष्कळ बुद्धिमान् लोकांस वाटतें. भगवद्गीतेंत पुनर्जन्माचा सिद्धांत आहे म्हणजे माणसाला अनेक जन्म असतात असें भगवान् श्रीकृष्णांचें 'मत' आहे असा अर्थ हे लोक करतात. हा अर्थ बरोबर नाहीं. धर्मांतील सिद्धांत म्हणजे 'मतें' नव्हेत. धर्मांतील सिद्धांत हें संशोधन असतें, अंतर्ज्ञान असतें असें आमचें म्हणणें आहे.

माणसाचें मत हें त्याच्या मनावर अवलंबून असतें. माणसाचें शिक्षण, त्याची परिस्थिति, त्याच्या आवडीनिवडी, त्याचें ध्येय, त्याचे दुराग्रह, त्याचें हिताहित वगैरेंचा परिणाम माणसाच्या मनावर होतो व हें मन साधक बाधक गोष्टींचा विचार करून जो निर्णय ठरवितें त्याला आपण 'मत' म्हणतों. कांहीं लोक पुराण 'मत'वादी असतात, त्यांना जुन्या चालीरीती आवडतात व नवीन गोष्टींना त्यांचा विरोध असतो. कांहीं लोक नव्या 'मताचे' असतात त्यांना जुन्या चालीरीती नापसंत असतात. कांहीं कम्यूनिस्ट 'मताचे' असतात, कांहीं भांडवलशाही 'मताचे' असतात, तर कांहीं समाजवादी 'मताचे' असतात. आपण अनेक माणसांस भेटलों तर कांहींच्या विषयीं आपलें 'मत' चांगलें होतें, तर कांहींविषयीं 'मत' वाईट होतें. दोन वाचकांनीं तेंच पुस्तक वाचलें तर एकाचें 'मत' त्या पुस्तकाला अनुकूल होतें तर दुसऱ्याचें प्रतिकूल होतें. दोन डॉक्टरांनीं एक रोगी तपासला तर तो बरा होईल असें एक 'मत' देतो व त्याचा रोग असाध्य आहे असें दुसऱ्याचें 'मत' पडतें. या उदाहरणांवरून दिसून येईल कीं माणसानें विचार करून आपल्या मनानें जो निष्कर्ष किंवा जें अनुमान काढलें असेल त्याला आपण 'मत' म्हणतों. सर्व माणसांचीं मनें सारखीं नसतात. कांहींचीं मनें जोरदार तर कांहींचीं दुबळीं असतात. कांहींच्या मनाला तर्कशुद्ध विचारसरणी करतां येते, कांहींना करतां येत नाहीं, वेगवेगळ्या परिस्थितीचे माणसाच्या मनावर वेगवेगळे संस्कार होतात. कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचें याबद्दलही माणसांमाणसांच्या मनांत फेर दिसून येतो. अशा अनेक कारणांमुळें एकाच गोष्टीविषयीं अनेकांचीं अनेक 'मतें' पडतात.

## 'मत' व 'संशोधन'

धर्मांतील सिद्धांत हें 'मत' नव्हे, तें 'संशोधन' आहे असें आम्ही या पुस्तकांत दाखविणार आहों. शनीला कडें आहे असें गॅलिलियो म्हणे. त्यानें दुर्बिणीनें शनि पाहिला होता व त्याला तें कडें दिसलें

होतें. झाडें श्वासोच्छ्वास करतात असें वनस्पतिशास्त्र सांगतें. झाडाच्या फांद्या पाण्यानें भरलेल्या कांचेच्या चंबूत वनस्पति-शास्त्रज्ञ ठेवतात व त्यांत उत्पन्न झालेला ऑक्सिजन गोळा करून तपासतात व त्यावरून झाडाचीं पानें श्वास बाहेर टाकतात असें ते म्हणतात. प्राण्यांचीं शरीरें पेशींपासून बनलेलीं असतात असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. हे शास्त्रज्ञ प्राण्यांच्या शरीराचे बारीक छेद कापून सूक्ष्मदर्शक यंत्रांतून त्यांची तपासणी करतात आणि ते पेशीमय आहेत हें प्रत्यक्ष पाहून तसलें विधान करतात. सल्फ्यूरिक ॲसिड जस्ताच्या तुकड्यावर ओतलें तर त्यांतून हैड्रोजन वायु निघतो असें रसायनशास्त्राच्या पुस्तकांत लिहिलेलें आहे. तें विधान करण्यापूर्वीं रसायनशास्त्रज्ञांनीं जस्तावर सल्फ्यूरिक ॲसिड ओतून काय होतें तें बारकाईनें तपासून पाहिलेलें असतें. या सर्व क्रियांस आपण हल्लीं 'संशोधन' म्हणतो. जुन्या काळीं ज्ञान, अनुभव अशीं नांवें हिंदुधर्म त्याला देई. संशोधन हें 'मत' नव्हे. मत हें माणसाच्या मनांत, त्याच्या अन्तर्यामांत बनत असतें आणि माणसांमाणसांच्या मनांत फरक असल्यामुळें एकाच गोष्टीसंबंधाचीं माणसांचीं मतें भिन्न असूं शकतात. उलट संशोधन करतांना माणूस बाह्य सृष्टीचें निरीक्षण करतो. उदाहरणार्थ ज्योतिःशास्त्रज्ञ आकाशांतील ग्रह-ताऱ्यांचें आपल्या डोळ्यांनीं निरीक्षण करतो, व डोळ्यांस मदत म्हणून जरूर तेव्हां दुर्बीण वापरतो. वनस्पतिशास्त्रज्ञ वनस्पतींचीं पानें, मुळें, फुलें, फळें यांचें अवलोकन आपल्या डोळ्यांनीं करतो आणि पानांतल्या पेशी फार लहान असल्यामुळें त्यांचें अवलोकन करण्याकरितां आपल्या डोळ्यांस सूक्ष्मदर्शकाची मदत देतो. असलें संशोधन जर काळजीनें केलें असेल तर त्यांत भिन्नता येऊं शकत नाहीं. शनीला कडें आहे हें 'मत' नसून 'संशोधन' आहे. ज्याचे डोळे धड आहेत अशा कोणाहि माणसानें दुर्बिणींतून शनि नीटपणें पाहिला तर त्याला कडें दिसतें, आणि म्हणून माणसांमाणसांच्या मतांत जशी भिन्नता आढळते, तशी संशोधनांत आढळणें शक्य असत नाहीं. माणसांच्या मतांपैकीं कांहीं बरोबर असतात व कांहीं

चुकीचीं असतात. संशोधन हें सृष्टींतल्या वस्तुस्थितीचें निरीक्षण असल्यामुळें, जर माणसानें तें संशोधन काळजीनें, बारकाईनें व पुनः पुन्हां केलेलें असेल तर तें बिनचुक असतें, खरें असतें.

धर्मांतील सिद्धांत म्हणजे 'मतें' नव्हत, तें 'संशोधन' आहे आणि संशोधन असल्यामुळें तें खरें आहे असें आमचें म्हणणें आहे. हा मुद्दा आमच्या वाचकांस पटवून देण्याकरितां आम्ही प्रस्तुत पुस्तक लिहीत आहों. हा मुद्दा जनतेस पटला, तरच आजच्या काळीं आवश्यक झालेली धर्माची नवीन मांडणी आपणांस करतां येईल, व धर्मांमधील नवीन प्रश्नांस नीट उत्तरें देतां येऊन धर्माच्या क्षेत्रांत नव चैतन्य ओततां येईल.

तारीख<br>२० ऑक्टोबर १९५५

**वासुदेव लक्ष्मण चिपळोणकर, पुणें**<br>**राजाराम सखाराम भागवत, ठाणें**

# आ भा र

या पुस्तकांत ठिकठिकाणीं अनेक ग्रंथांचे आधार दिलेले आहेत. त्या सर्व ग्रंथकारांचे आम्ही येथें मनापासून आभार मानीत आहों. पृ.४८ लगतच्या पानावर Sunken Atlantis नांवाची आकृति आम्ही दिली आहे. ही आकृति जिनराजदासकृत First Principles of Theosophy या पुस्तकांतून घेतलेली असून प्रकाशक Theosophical Publishing House, Adyar यांच्या सौजन्यानें ती आम्हांस या पुस्तकांत देतां आली आहे. त्याच पानावर डॉ. एरिक नोरीन यांनीं काढलेला नकाशा व गोबी समुद्राचा थिऑसफीय नकाशा अशा दोन आकृति दिल्या आहेत. हे नकाशे Where Theosophy and Science Meet या कांगाकृत पुस्तकांतून (आवृत्ति १९४९) खंड १ पृ. १०६ वरून आम्हीं घेतले आहेत. हे दोन्ही नकाशे श्री. कांगा व प्रकाशक The Adyar Library Association यांच्या सौजन्यानें येथें देतां आलेले आहेत. डॉ. नोरीन यांचा नकाशा The Geographical Review या अमेरिकेंतील मासिकांत १९३२ सालीं मूलतः प्रसिद्ध झालेला होता; त्यांच्या संपादकांनींही आम्हांस जरूर ती परवानगी दिली आहे. या सर्वांचे आम्ही आभारी आहों. या पुस्तकांत मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या The Secret Doctrine मधले आधार जागोजाग दिले आहेत. ते अड्यार आवृतींतले आहेत. The Mahatma Letters या पुस्तकांमधील आधार आठव्या आवृत्तींतले आहेत.

# या पुस्तकांतील विषयावर वाचनीय वाङ्मय

## मराठी पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| (१) योगसिद्धि व ईश्वरी साक्षात्कार —डॉ. वि. म. भट कृत | किं० | ७- ८-० |
| (२) स्वप्न-सृष्टि—ले. ज. ना. ढगे एम्. ए. | किं० | १- ८-० |
| (३) सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय —ले. वा. ल. चिपळुणकर व रा. स. भागवत | किं० | १-१२-० |
| (४) थिआसफींत नवीन काय आहे? ले. वा. ल. चिपळुणकर व रा. स. भागवत | किं० | ०- ४-० |
| (५) महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार —ले. रा. स. भागवत | किं० | १- ८-० |

## इंग्रजी पुस्तकें

(1) **Where Theosophy and Science meet**
Two Volumes - by Prof. D. D. Kanga Rs. 24-0-0

(2) Corroborations of Occult Archaeology
by G. Nevin Drinkwater

(3) Occult Investigations - by C. Jinarajadasa Re. 1-4-0

(4) Scientific Corroborations of Theosophy
by A. Marques - J. P. H. London (1908)

(5) Dreams - by C. W. Leadbeater 1-8-0

(6) Man: Whence, How & Whither
by Annie Besant & C. W. Leadbeater

(7) The Changing World - by A. Besant

All the books are available from the Theosophical Publishing House, Adyar, Madras.

# अनुक्रमणिका

# अंतर्ज्ञान खरें असतें काय?

## प्रकरण १ लें

## धर्म व अदृश्य सृष्टीचें संशोधन

धर्माच्या क्षेत्रांत जे मुद्दे येतात ते माणसाला न दिसणाऱ्या गोष्टींविषयींचे असतात. 'न हन्यते हन्यमाने शरीरे' म्हणजे देहाचा जरी वध झाला तरी या देहांतील जीव मरत नाहीं असें गीता सांगते. अर्थात् आपणाला जो जीव दिसत नाहीं त्याबद्दलचें हें विधान आहे. 'यथा क्रतुः अस्मिन् लोके पुरुषो भवति तथा इतः प्रेत्य भवति।' असें उपनिषदांत (छांदोग्य ३, १४, १) लिहिलेलें आहे. ह्या लोकीं जसा माणसाचा विचार असेल तसा तो मृत्यूनंतर परलोकीं बनतो असा त्या वचनाचा अभिप्राय आहे. पण एका माणसाच्या मनांत येणारा विचार दुसऱ्याला दिसत नाहीं, आणि परलोकीं त्याचा परिणाम काय होतो तेंही दिसत नाहीं. ईश्वर आहे कीं नाहीं, मृत माणसाचें श्राद्ध करावें कीं करूं नये, माणसाला एकच जन्म असतो कीं अनेक असतात, हे प्रश्न माणसाच्या इंद्रि-यांना गम्य नसणाऱ्या गोष्टींविषयींचे आहेत. आपण रबरी चेंडू भिंतीवर फेंकला तर तो उलटून आपणांकडे येतो ही गोष्ट आपण पाहूं शकतों. आपण दुसऱ्याचें नुकसान केलें तर ती क्रियाही चेंडू सारखी आपणांवर उलटून आपणांस दुःख देते, असें हिंदुधर्मांतील कर्माचा सिद्धांत आपणांस शिकवितो. पण चेंडू जसा भिंतीकडे जातांना दिसतो, व भिंतीवर आपटून परत आपणांकडे येतांना दिसतो, तशी कर्माची गोष्ट नाहीं. माणसाला डोळा, कान, त्वचा वगैरे इंद्रियें आहेत. त्यांचा उपयोग करून तो बाह्य सृष्टीचें

# प्रस्तावना

धर्म म्हणजे काय? या प्रश्नाला एक नवीन प्रकारचें उत्तर देण्याकरितां हें पुस्तक आम्ही महाराष्ट्रीय वाचकांसमोर ठेवीत आहों.

जगांत अनेक धर्म आहेत. प्रत्येक धर्मांत अनेक चालीरीती असतात आणि वेडगळ समजुतीही असतात. या चालीरीतींना व वेडगळ समजुतींनाही सामान्य लोक 'धर्म' म्हणून म्हणतात. प्रत्येक धर्मांत हा जो चालीरीतींचा व भ्रामक समजुतींचा भाग आहे तो वेगळा काढला तर त्यांत ज्ञानाचाही कांहीं भाग शिल्लक असलेला दिसून येतो. उदाहरणार्थ, हिंदुधर्मांत असा ज्ञानाचा भाग असून तो भगवद्गीता, उपनिषदें वगैरे ग्रंथांत दिलेला आढळतो. मृत्यूनंतर माणसाचा जीव शिल्लक रहातो, माणूस पुनः पुन्हां जन्मास येतो, माणसाची उन्नति होतहोत परिणामीं तो ईश्वरासमान बनतो, सृष्टीचें रहाटगाडगें फिरविणारा ईश्वर नांवाचा एक सूत्रधार सृष्टीच्या पाठीशीं आहे, माणसानें दुसऱ्यास दुःख दिलें तर त्याच्या वाटयास दुःख येतें, सुख दिलें तर सुख येतें, सृष्टींत अदृश्य असे अनेक लोक आहेत वगैरे विधानें हिंदुधर्माच्या आकर ग्रंथांत आढळतात. हा ज्ञानाचा भाग आहे. पुष्कळदां आपण या गोष्टींना 'सिद्धांत' म्हणतों

पण सिद्धांत म्हणजे काय ? हिंदुधर्मांत पुनर्जन्माचा 'सिद्धांत' आहे असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां सिद्धांत शब्दाचा आपला अर्थ काय असतो ? सिद्धांत म्हणजे 'मत' होय असें पुष्कळ बुद्धिमान् लोकांस वाटतें. भगवद्गीतेंत पुनर्जन्माचा सिद्धांत आहे म्हणजे माणसाला अनेक जन्म असतात असें भगवान् श्रीकृष्णांचें 'मत' आहे असा अर्थ हे लोक करतात. हा अर्थ बरोबर नाहीं. धर्मांतील सिद्धांत म्हणजे 'मतें' नव्हेत. धर्मांतील सिद्धांत हें संशोधन असतें, अंतर्ज्ञान असतें असें आमचें म्हणणें आहे.

माणसाचें मत हें त्याच्या मनावर अवलंबून असतें. माणसाचें शिक्षण, त्याची परिस्थिति, त्याच्या आवडीनिवडी, त्याचें ध्येय, त्याचे दुराग्रह, त्याचें हिताहित वगैरेंचा परिणाम माणसाच्या मनावर होतो व हें मन साधक बाधक गोष्टींचा विचार करून जो निर्णय ठरवितें त्याला आपण 'मत' म्हणतों. कांहीं लोक पुराण 'मत'वादी असतात, त्यांना जुन्या चालीरीती आवडतात व नवीन गोष्टींना त्यांचा विरोध असतो. कांहीं लोक नव्या 'मताचे' असतात त्यांना जुन्या चालीरीती नापसंत असतात. कांहीं कम्यूनिस्ट 'मताचे' असतात, कांहीं भांडवलशाही 'मताचे' असतात, तर कांहीं समाजवादी 'मताचे' असतात. आपण अनेक माणसांस भेटलों तर कांहींच्या विषयीं आपलें 'मत' चांगलें होतें, तर कांहींविषयीं 'मत' वाईट होतें. दोन वाचकांनीं तेंच पुस्तक वाचलें तर एकाचें 'मत' त्या पुस्तकाला अनुकूल होतें तर दुसऱ्याचें प्रतिकूल होतें. दोन डॉक्टरांनीं एक रोगी तपासला तर तो बरा होईल असें एक 'मत' देतो व त्याचा रोग असाध्य आहे असें दुसऱ्याचें 'मत' पडतें. या उदाहरणांवरून दिसून येईल कीं माणसानें विचार करून आपल्या मनानें जो निष्कर्ष किंवा जें अनुमान काढलें असेल त्याला आपण 'मत' म्हणतों. सर्व माणसांचीं मनें सारखीं नसतात. कांहींचीं मनें जोरदार तर कांहींचीं दुबळीं असतात. कांहींच्या मनाला तर्कशुद्ध विचारसरणी करतां येते, कांहींना करतां येत नाहीं, वेगवेगळ्या परिस्थितीचे माणसाच्या मनावर वेगवेगळे संस्कार होतात. कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचें याबद्दलही माणसांमाणसांच्या मनांत फेर दिसून येतो. अशा अनेक कारणांमुळें एकाच गोष्टीविषयीं अनेकांचीं अनेक 'मतें' पडतात.

## 'मत' व 'संशोधन'

धर्मांतील सिद्धांत हें 'मत' नव्हे, तें 'संशोधन' आहे असें आम्ही या पुस्तकांत दाखविणार आहों. शनीला कडें आहे असें गॅलिलियो म्हणे. त्यानें दुर्बिणीनें शनि पाहिला होता व त्याला तें कडें दिसलें

होतें. झाडें श्वासोच्छ्वास करतात असें वनस्पतिशास्त्र सांगतें. झाडाच्या फांद्या पाण्यानें भरलेल्या कांचेच्या चंबूत वनस्पति-शास्त्रज्ञ ठेवतात व त्यांत उत्पन्न झालेला ऑक्सिजन गोळा करून तपासतात व त्यावरून झाडाचीं पानें श्वास बाहेर टाकतात असें ते म्हणतात. प्राण्यांचीं शरीरें पेशींपासून बनलेलीं असतात असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. हे शास्त्रज्ञ प्राण्यांच्या शरीराचे बारीक छेद कापून सूक्ष्मदर्शक यंत्रांतून त्यांची तपासणी करतात आणि ते पेशीमय आहेत हें प्रत्यक्ष पाहून तसलें विधान करतात. सल्फ्यूरिक ॲसिड जस्ताच्या तुकड्यावर ओतलें तर त्यांतून हैड्रोजन वायु निघतो असें रसायनशास्त्राच्या पुस्तकांत लिहिलेलें आहे. तें विधान करण्यापूर्वीं रसायनशास्त्रज्ञांनीं जस्तावर सल्फ्यूरिक ॲसिड ओतून काय होतें तें बारकाईनें तपासून पाहिलेलें असतें. या सर्व क्रियांस आपण हल्लीं 'संशोधन' म्हणतो. जुन्या काळीं ज्ञान, अनुभव अशीं नांवें हिंदुधर्म त्याला देई. संशोधन हें 'मत' नव्हे. मत हें माणसाच्या मनांत, त्याच्या अन्तर्यामांत बनत असतें आणि माणसांमाणसांच्या मनांत फरक असल्यामुळें एकाच गोष्टीसंबंधाचीं माणसांचीं मतें भिन्न असूं शकतात. उलट संशोधन करतांना माणूस बाह्य सृष्टीचें निरीक्षण करतो. उदाहरणार्थ ज्योतिःशास्त्रज्ञ आकाशांतील ग्रह-तार्‍यांचें आपल्या डोळ्यांनीं निरीक्षण करतो, व डोळ्यांस मदत म्हणून जरूर तेव्हां दुर्बीण वापरतो. वनस्पतिशास्त्रज्ञ वनस्पतींचीं पानें, मुळें, फुलें, फळें यांचें अवलोकन आपल्या डोळ्यांनीं करतो आणि पानांतल्या पेशी फार लहान असल्यामुळें त्यांचें अवलोकन करण्याकरितां आपल्या डोळ्यांस सूक्ष्मदर्शकाची मदत देतो. असलें संशोधन जर काळजीनें केलें असेल तर त्यांत भिन्नता येऊं शकत नाहीं. शनीला कडें आहे हें 'मत' नसून 'संशोधन' आहे. ज्याचे डोळे धड आहेत अशा कोणाहि माणसानें दुर्बिणींतून शनि नीटपणें पाहिला तर त्याला कडें दिसतें, आणि म्हणून माणसांमाणसांच्या मतांत जशी भिन्नता आढळते, तशी संशोधनांत आढळणें शक्य असत नाहीं. माणसांच्या मतांपैकीं कांहीं बरोबर असतात व कांहीं

चुकीचीं असतात. संशोधन हें सृष्टींतल्या वस्तुस्थितीचें निरीक्षण असल्यामुळें, जर माणसानें तें संशोधन काळजीनें, बारकाईनें व पुनः पुन्हां केलेलें असेल तर तें बिनचुक असतें, खरें असतें.

धर्मांतील सिद्धांत म्हणजे 'मतें' नव्हत, तें 'संशोधन' आहे आणि संशोधन असल्यामुळें तें खरें आहे असें आमचें म्हणणें आहे. हा मुद्दा आमच्या वाचकांस पटवून देण्याकरितां आम्ही प्रस्तुत पुस्तक लिहीत आहों. हा मुद्दा जनतेस पटला, तरच आजच्या काळीं आवश्यक झालेली धर्माची नवीन मांडणी आपणांस करतां येईल, व धर्मांमधील नवीन प्रश्नांस नीट उत्तरें देतां येऊन धर्माच्या क्षेत्रांत नव चैतन्य ओततां येईल.

तारीख<br>२० ऑक्टोबर १९५५

**वासुदेव लक्ष्मण चिपळोणकर, पुणें**<br>**राजाराम सखाराम भागवत, ठाणें**

# आभार

या पुस्तकांत ठिकठिकाणीं अनेक ग्रंथांचे आधार दिलेले आहेत. त्या सर्व ग्रंथकारांचे आम्ही येथें मनापासून आभार मानीत आहों. पृ.४८ लगतच्या पानावर Sunken Atlantis नांवाची आकृति आम्ही दिली आहे. ही आकृति जिनराजदासकृत First Principles of Theosophy या पुस्तकांतून घेतलेली असून प्रकाशक Theosophical Publishing House, Adyar यांच्या सौजन्यानें ती आम्हांस या पुस्तकांत देतां आली आहे. त्याच पानावर डॉ. एरिक नोरीन यांनीं काढलेला नकाशा व गोबी समुद्राचा थिऑसफीय नकाशा अशा दोन आकृति दिल्या आहेत. हे नकाशे Where Theosophy and Science Meet या कांगाकृत पुस्तकांतून (आवृत्ति १९४९) खंड १ पृ. १०६ वरून आम्हीं घेतले आहेत. हे दोन्ही नकाशे श्री. कांगा व प्रकाशक The Adyar Library Association यांच्या सौजन्यानें येथें देतां आलेले आहेत. डॉ. नोरीन यांचा नकाशा The Geographical Review या अमेरिकेंतील मासिकांत १९३२ सालीं मूलतः प्रसिद्ध झालेला होता; त्यांच्या संपादकांनींही आम्हांस जरूर ती परवानगी दिली आहे. या सर्वांचे आम्ही आभारी आहों. या पुस्तकांत मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या The Secret Doctrine मधले आधार जागोजाग दिले आहेत. ते अड्यार आवृतींतले आहेत. The Mahatma Letters या पुस्तकांमधील आधार आठव्या आवृत्तींतले आहेत.

## या पुस्तकांतील विषयावर वाचनीय वाङ्मय

### मराठी पुस्तकें

(१) योगसिद्धि व ईश्वरी साक्षात्कार किं० ७- ८-०
—डॉ. वि. म. भट कृत
(२) स्वप्न-सृष्टि—ले. ज. ना. ढगे एम्. ए. किं० १- ८-०
(३) सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय
—ले. वा. ल. चिपळुणकर व रा. स. भागवत किं० १-१२-०
(४) थिऑसफींत नवीन काय आहे ?
ले. वा. ल. चिपळुणकर व रा. स. भागवत किं० ०- ४-०
(५) महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार
—ले. रा. स. भागवत किं० १- ८-०

### इंग्रजी पुस्तकें

(1) **Where Theosophy and Science meet**
Two Volumes – by Prof. D. D. Kanga Rs. 24-0-0
(2) Corroborations of Occult Archaeology
by G. Nevin Drinkwater
(3) Occult Investigations - by C. Jinarajadasa Re. 1-4-0
(4) Scientific Corroborations of Theosophy
by A. Marques – J. P. H. London (1908)
(5) Dreams – by C. W. Leadbeater 1-8-0
(6) Man: Whence, How & Whither
by Annie Besant & C. W. Leadbeater
(7) The Changing World – by A. Besant

All the books are available from the Theosophical Publishing House, Adyar, Madras.

# अनुक्रमणिका

# अंतर्ज्ञान खरें असतें काय?

## प्रकरण १ लें

## धर्म व अदृश्य सृष्टीचें संशोधन

धर्माच्या क्षेत्रांत जे मुद्दे येतात ते माणसाला न दिसणाऱ्या गोष्टींविषयींचे असतात. 'न हन्यते हन्यमाने शरीरे' म्हणजे देहाचा जरी वध झाला तरी या देहांतील जीव मरत नाहीं असें गीता सांगते. अर्थात् आपणाला जो जीव दिसत नाहीं त्याबद्दलचें हें विधान आहे. 'यथा क्रतु: अस्मिन् लोके पुरुषो भवति तथा इत: प्रेत्य भवति।' असें उपनिषदांत (छांदोग्य ३, १४, १) लिहिलेलें आहे. ह्या लोकीं जसा माणसाचा विचार असेल तसा तो मृत्यूनंतर परलोकीं बनतो असा त्या वचनाचा अभिप्राय आहे. पण एका माणसाच्या मनांत येणारा विचार दुसऱ्याला दिसत नाहीं, आणि परलोकीं त्याचा परिणाम काय होतो तेंही दिसत नाहीं. ईश्वर आहे कीं नाहीं, मृत माणसाचें श्राद्ध करावें कीं करूं नये, माणसाला एकच जन्म असतो कीं अनेक असतात, हे प्रश्न माणसाच्या इंद्रियांना गम्य नसणाऱ्या गोष्टींविषयींचे आहेत. आपण रबरी चेंडू भिंतीवर फेंकला तर तो उलटून आपणांकडे येतो ही गोष्ट आपण पाहूं शकतों. आपण दुसऱ्याचें नुकसान केलें तर ती क्रियाही चेंडूसारखी आपणांवर उलटून आपणांस दु:ख देते, असें हिंदुधर्मांतील कर्माचा सिद्धांत आपणांस शिकवितो. पण चेंडू जसा भिंतीकडे जातांना दिसतो, व भिंतीवर आपटून परत आपणांकडे येतांना दिसतो, तशी कर्माची गोष्ट नाहीं. माणसाला डोळा, कान, त्वचा वगैरे इंद्रियें आहेत. त्यांचा उपयोग करून तो बाह्य सृष्टीचें

ज्ञान मिळवितो; पण धर्माच्या क्षेत्रांत येणाऱ्या गोष्टी त्याच्या इंद्रियांना गोचर असत नाहींत. अर्थात् धर्माचें क्षेत्र म्हणजे इंद्रियांना अगम्य असणाऱ्या गोष्टीचें क्षेत्र होय हें उघड आहे.

## इंद्रियांचें सामर्थ्य

धर्मातील 'सिद्धान्त' हें मत नव्हे, तर तें 'संशोधन' आहे असें आमचें म्हणणें आहे. माणसाला अदृश्य असणारी जी सृष्टि आहे, तिचेंही संशोधन होऊं शकतें. वनस्पतिशास्त्रज्ञ हा आपल्या डोळयांचा उपयोग करून निरनिराळीं झाडें, त्यांचीं मुळें, पानें, फुलें व फळें यांचें बारकाईनें निरीक्षण करतो, आणि या माहितीला आपण वनस्पतिशास्त्र असें नांव देतों. त्याचप्रमाणें माणसाला सभोंवतालची अदृश्य सृष्टि पाहून तिचेंही संशोधन करतां येतें. माणसाच्या मनाच्या व इंद्रियांच्या शक्ति कायम ठशाच्या नसतात. सृष्टींतल्या सर्व गोष्टींना जशी वाढ आहे, तद्वत् माणसाचीं इंद्रियें व मन यांच्या शक्तीनाही वाढ आहे. अंधळा माणूस 'ब्रेल'लिपींत लिहिलेलें पुस्तक वाचूं शकतो. भाजलेल्या पापडावर जसे लहान लहान फोड येतात तशा तऱ्हेचे फोड (किंवा उंचवटे) कागदावर निर्माण करून ब्रेल लिपींतील पुस्तकें तयार करतात. या उंचवटयांची निरनिराळी मांडणी करून त्यांची ब्रेल नांवाची एक लिपी बनविलेली आहे. या लिपींत छापलेल्या ओळींवरून आपण बोटें फिरविलीं तर आपल्या बोटांना फक्त कांहीं खडबडीत भाग जाणवतो; पण अंधळा माणूस कांहीं दिवस त्या लिपीवरून बोटें फिरविण्याचा अभ्यास करून ती लिपी शिकला तर त्याला प्रत्येक अक्षर स्पर्शज्ञानानें ओळखतां येतें व तो त्या लिपीचें पुस्तक वाचूं शकतो. याचा अर्थ असा कीं माणसाच्या बोटाला बेताचें स्पर्शज्ञान आहे. तो आपल्या बोटांनीं गुळगुळीत वस्तु कोणती व खडबडीत वस्तु कोणती इतकेंच ओळखूं शकतो. पण त्यानें अभ्यास केल्यास त्याच्या त्वचेची संवेदनक्षमता वाढते आणि मग तो निरनिराळीं अक्षरें स्पर्शज्ञानानें ओळखूं शकतो. मेस्कालिन

(mescalin) नांवाचें एक औषध आहे. सुप्रसिद्ध लेखक आल्डूस हक्स्ले यांना तें एकदां प्रयोगादाखल देण्यांत आलें; आणि मग त्यांना पुस्तकें, फुलें, चित्रें, खुर्च्या, टेबलें वगैरे पदार्थ दाखविण्यांत आले. त्यांनीं आपला अनुभव लिहिला आहे कीं, त्या औषधाचा जोंवर त्यांच्यावर परिणाम होता तोंवर त्यांच्या मनाच्या व इंद्रियांच्या शक्ति अधिक जोरदार व तीव्र झाल्या होत्या. या उदाहरणावरून स्पष्ट होईल कीं, माणसाच्या मनाच्या व इंद्रियांच्या शक्ति कायम छापाच्या नसून त्यांची वाढ होऊं शकते.[1]

## सिद्धि म्हणजे काय ?

ह्या वाढलेल्या इंद्रियशक्तींना योगशास्त्रांत 'सिद्धि' म्हणतात. एकाद्या माणसानें आपली पाहण्याची शक्ति वाढविली तर इतरांना ज्या वस्तु दिसत नाहींत त्या त्याला दिसूं लागतील व इतरांना जे ध्वनि ऐकूं येत नाहींत ते त्याला ऐकूं येतील. स्वतःच्या मनाच्या व इंद्रियांच्या शक्ति विकसित करण्याचें एक शास्त्र आहे. त्याला राजयोग शास्त्र म्हणतात. या शास्त्राचा अभ्यास केल्यास माणसाला आपल्या इंद्रियांच्या व मनाच्या शक्ति अधिक जोरदार व कुशाग्र करतां येतात. माणसाला व्यायाम करून जसे आपले स्नायू बळकट करतां येतात व त्या क्रियेंत चमत्कारिक, अद्भुत किंवा सृष्टिक्रमाविरुद्ध असें कांहीं नसतें, तद्वत् राजयोगांतील इंद्रियशक्ति वाढविण्याची क्रिया ही स्वाभाविक असते. कळी फुलणें, लहान रोपट्याचें मोठें झाड होणें, या गोष्टी जितक्या निसर्गास धरून आहेत, तितक्याच राजयोगांतील सिद्धि निसर्गास धरून आहेत.

ज्या माणसानें आपल्या इंद्रियशक्ति फुलविल्या असतील (सिद्धि संपादन केल्या असतील) त्याला अदृश्य सृष्टीचें प्रत्यक्ष निरीक्षण करतां येतें. त्याच्या वाढलेल्या शक्तींच्या टप्प्यांत अदृश्य

१ पहा अल्डुस हक्स्लेकृत The Doors of Perception १९५४ प्रकाशक Chatto & Windus.

सृष्टि आलेली असते. जितक्या शक्ति अधिक वाढलेल्या असतील तितकी अदृश्य सृष्टि त्याला जास्त प्रमाणांत प्रत्यक्ष दिसूं शकते. साध्या पंचेंद्रियांनीं व जरूर तर दुर्बीण, सूक्ष्मदर्शक यांचें साहाय्य घेऊन शास्त्रज्ञ दृश्यसृष्टीचें जसें अवलोकन व संशोधन करतो तद्वत् या कुशाग्र इंद्रियशक्तींनीं राजयोगी अदृश्य सृष्टीचें अवलोकन व संशोधन करूं शकतो. या संशोधनावर धर्माचे सिद्धांत आधारलेले असतात असें आमचें म्हणणें आहे.

सिद्धींचें विस्तृत वर्णन या छोटचा पुस्तकांत देतां येणार नाहीं. पण अदृश्य सृष्टीच्या संशोधनाची यथार्थ कल्पना आमच्या वाचकांस यावी म्हणून सिद्धीविषयींची येथें थोडीशी माहिती देणें अवश्य आहे. माणसाच्या इंद्रिय-शक्तींची वाढ झाली म्हणजे त्याला सिद्धि आली असें म्हणतात. माणसाची पाहण्याची शक्ति वाढते, ऐकण्याची शक्ति वाढते, इतकेंच नव्हे तर नवीन प्रकारच्या इंद्रियशक्तिही त्याला मिळूं शकतात. सिद्धि या शब्दांत या नव्या शक्तींचाही समावेश करणें जरूर आहे. सिद्धि अनेक आहेत. एका सिद्धीचा एका प्रकारच्या संशोधनांत उपयोग होतो तर दुसऱ्या सिद्धीचा दुसऱ्या प्रकारच्या संशोधनांत उपयोग होतो. तसेंच प्रत्येक सिद्धीच्या उच्चनीच अशा अनेक पायऱ्या असलात. कमी सामर्थ्याच्या सूक्ष्मदर्शकानें अमुक एका मर्यादेपर्यंतचे बारीक पदार्थ दिसतात, तर अधिक सामर्थ्याच्या सूक्ष्मदर्शकानें त्याहूनही बारीक पदार्थ दिसतात. तद्वत् खालच्या दर्जाच्या सिद्धीनें अदृश्य सृष्टींतील एक क्षेत्र माणसाला उघडें होतें, तर वरच्या दर्जाच्या सिद्धीनें त्याहून वरचें क्षेत्र उघडें होतें. माणसाला अनेक देह असतात. त्यांपैकीं जड देह हा सर्वांच्या परिचयाचा आहे. त्याला पांच ज्ञानेंद्रियें असतात. त्या इंद्रियांच्या शक्ति सर्वांना असल्यामुळें त्यांना कोणी 'सिद्धि' असें नांव देत नाहीं. पण या इंद्रियशक्ति वाढून मोठचा झाल्या किंवा माणसाला पूर्वीं नसलेल्या नवीन शक्ति आल्या म्हणजे त्यांना सिद्धि म्हणतात. सगळ्या सिद्धींना संकलित रीतीनें एक नांव द्यावयाचें तर 'सूक्ष्मदृष्टि' हें नांव योग्य होईल. इंग्रजींत सामान्यतः

Clairvoyance असें म्हणतात. माणसाच्या जड देहाच्या आंत सर्वत्र पसरलेला ईथरचा एक कोष असतो. त्याला हिंदुधर्मांत प्राणमयकोष म्हणतात व त्यांतील कांहीं द्रव्य माणसाच्या डोळ्यांच्या सभोंवार पसरलेलें असतें. ह्या द्रव्यांत विशिष्ट प्रकारची शक्ति निर्माण केल्यास माणसाला सर्व पदार्थ पारदर्शक होतात आणि बंद केलेल्या पेटींत काय आहे तें त्याला दिसूं शकतें. माणसाचा दृश्य देह व प्राणमय कोष या दोहोंस व्यापणारे आणखी निरनिराळ्या द्रव्यांचे कोष असतात. त्यांस वासनादेह, मनोदेह व कारणदेह अशीं नांवें आहेत. या सर्व देहांना वेगवेगळ्या प्रकारच्या ज्ञानशक्ति व क्रिया-शक्ति आहेत. आपल्या पृथ्वीभोंवतीं जसें एक हवेचें वातावरण आहे, तद्वत् विरलतर–विरलतम अशीं द्रव्यांचीं दुसरींही वातावरणें आहेत. त्यांना भूवर्लोक, स्वर्लोक अशीं नांवें आहेत. या 'लोकांत' निरनिराळे जीव राहतात, निरनिराळ्या क्रिया चालू असतात व सृष्टीची निरनिराळी वेषभूषा दृश्यमान असते. वासनादेहाच्या शक्ति माणसानें संपूर्ण फुलविल्या म्हणजे त्याला वासनादेहानें भूवर्लोकांत सर्वभर हिंडतां येतें, तेथें मरणोत्तर स्थितींत असलेलीं जीं मनुष्यें असतील त्यांना भेटतां येतें, इतरांच्या मनांत ज्या वासना-भावना असतील त्या त्याला तेथें प्रत्यक्ष दिसतात व त्यांचे परिणाम पहातां येतात. मनोदेह व कारणदेह यांच्या शक्ति फुलविल्या म्हणजे पृथ्वीभोंवतीं असलेला जो स्वर्गलोक त्यांत हिंडतां येतें व तेथील गोष्टींचें ज्ञान मिळवितां येतें. या देहांना मरणोत्तर स्वर्गलोकांत गेलेल्या माणसांची स्थिति पाहतां येते. तेथील देवदेवतांची गांठ घेतां येते. अत्यंत बारीक पदार्थही मोठे करून पाहण्याची शक्ति येते. पृथ्वीवर घडलेल्या भूतकालच्या गोष्टीही समजतात. तसेंच कित्येक भविष्यकालीन गोष्टींचें ज्ञान मिळतें. पृथ्वीवर मानवी उत्क्रांतीचे जे ऋषितुल्य सूत्रधार आहेत त्यांच्याशीं संशोधकाला स्वतःचा ऋणानुबंध जोडतां येऊन त्यांनीं पृथ्वीवर होऊं घातलेल्या घटना व योजना त्याच्या दृष्टिपथांत येतात. पण या साऱ्या देहांतील ज्ञानामध्यें 'द्वैत' असतें, म्हणजे पाहणारा

'द्रष्टा' व तो जी गोष्ट पाहतो तें 'दृश्य' अशा दोन गोष्टी अस्तित्वांत असतात.

या देहांच्या पलीकडे जाऊनही माणसाला आणखी वरच्या पायरीचें ज्ञान मिळवितां येतें. त्या वरच्या पायरीवर गेल्यास माणसाला मंगळ, बुध वगैरे ग्रहांवर जातां येतें. ज्ञानाची ही जी वरची भूमिका आहे तींत द्रष्टा व दृश्य हें द्वैत मावळण्यास सुरुवात होत असल्यामुळें तेथील ज्ञानास ज्ञान, अनुभव वगैरे शब्द लावावे कीं नाहीं हा प्रश्न पडतो. पण कोणताही शब्द लावला तरी येथें माणसाला जी अनुभूति मिळते ती खरी असते, कविकल्पना नसते.

## अदृश्य सृष्टीचें संशोधन

वर जी सारांशरूपानें माहिती दिली आहे तीवरून आमच्या वाचकांस समजून येईल कीं माणसानें सिद्धि मिळविल्यास त्याला अदृश्य गोष्टी प्रत्यक्ष दिसूं शकतात. प्रत्यक्ष दिसणाऱ्या वनस्पतींचें काळजीपूर्वक, तपशीलवार व पुनः पुनः निरीक्षण करून वनस्पतिशास्त्रज्ञ जें ज्ञान मिळवितो त्याला आपण संशोधन म्हणतों. तद्वत् अदृश्यसृष्टींतील नाना गोष्टींचें काळजीपूर्वक तपशीलवार व पुनः पुनः निरीक्षण करून सिद्धि संपादन केलेला माणूस जें ज्ञान मिळवितो त्यालाही संशोधन हें नांव देणें अवश्य आहे.

## हें संशोधन खरें कशावरून ?

गेल्या पाऊणशें वर्षांत थिऑसफिकल सोसायटींत अशा प्रकारचें अदृश्य सृष्टीचें संशोधन फार मोठ्या प्रमाणावर करण्यांत आलेलें आहे. हिंदुधर्मांत (व इतर धर्मांतही) जो ज्ञानाचा भाग दिलेला आहे त्याला (हिंदुधर्मांतील भोळ्या समजुती व चालीरीती यांना नव्हे) या संशोधनाचा भरभक्कम दुजोरा मिळत आहे. माणसाचे सूक्ष्म कोष, त्याची मरणोत्तर स्थिति, त्याचे पूर्वजन्म, त्याचे विचार, विकार, त्याचें सुखदुःख, त्याचें बरेंवाईट कर्म, सृष्टींतील सूक्ष्म

लोक, सृष्टीची पूर्वकालीन व भावी उत्क्रांति, पिपीलिकामार्ग व विहंगममार्ग, ईश्वर व त्याची उत्क्रान्ति-योजना वगैरे अनेक विषयां-संबधानें पुष्कळ उपयुक्त व उद्‌बोधक माहिती या संशोधनांत मिळालेली आहे. हें संशोधन खरें मानल्यास भौतिक शास्त्रज्ञांनीं केलेल्या संशोधनाप्रमाणें हिंदुधर्म (व इतर धर्महि) सत्यावर अधिष्ठित आहेत असें सिद्ध होईल.

पण थिऑसफिकल सोसायटींत झालेलें हें अदृश्य सृष्टिविषयक संशोधन खरें आहे कशावरून ? भोळसट व स्वप्नाळू माणसानें आपल्या मनासमोर अनेक दिवास्वप्नें खेळविलीं व तीं त्याला खरीं वाटलीं म्हणून शहाणीं माणसें त्यांना श्रद्धेय मानीत नाहींत. अदृश्य सृष्टीचें संशोधन असल्या दिवास्वप्नासारखें फोल नसेल कशावरून ? एकाद्या लबाड माणसानें मला सिद्धि प्राप्त झाली आहे असें म्हणावें, आणि मी त्या सिद्धीच्या साहृयानें संशोधन केलें आहे असा बहाणा करून भाविक लोकांना आपल्या कच्छपीं लावावें असेंही होऊं शकेल. तेव्हां ज्याला अदृश्य सृष्टि दिसत नाहीं त्याला हृया संशोधनाची सत्यता पटवून देतां येईल का ? हा मुद्द्याचा प्रश्न येथें उद्‌भवतो. या मुद्द्याच्या प्रश्नाला सविस्तर उत्तर द्यावें यासाठीं हें पुस्तक लिहिण्यांत आलें आहे.

ज्याला अदृश्य सृष्टि दिसत नाहीं पण जो निःपक्षपाती वृत्तीचा जिज्ञासू आहे त्याला या संशोधनाची सत्यता पटवून देतां येईल असें आम्हांस निश्चयानें वाटतें. दृश्य सृष्टींतल्या गोष्टींचें संशोधन करणें हें थिऑसफिकल सोसायटीचें काम नाहीं. तें शास्त्रज्ञांचें काम आहे. पण अदृश्य गोष्टींचें संशोधन करीत असतांना कधीं कधीं सहजासहजीं दृश्य गोष्टींचीही माहिती संशोधकाला मिळूं शकते. वनस्पतींची माहिती मिळवूं पहाणारा वनस्पतिशास्त्रज्ञ प्रामुख्यानें वृक्षवेलींकडेसच लक्ष देतो. पण वृक्षवेलींचा जमिनीशीं निकट संबंध असल्यामुळें त्याला सहजासहजीं जमीन, तिचा भुस-भुशीतपणा, तींतील द्रव्यें, तिचा कस, यांची थोडीफार माहिती होते. तद्वत् अदृश्यसृष्टीचें संशोधन करीत असतांना दृश्यसृष्टीचें

क्षेत्र निकटवर्ती असल्यामुळें कधीं कधीं त्या क्षेत्रांतली माहितीही संशोधकाला मिळूं शकतें. ही दृश्य सृष्टीची माहितीही तो सिद्धींच्या साहाय्यानें मिळवितो. या माहितीचा जर नंतर पडताळा आला तर तो सिद्धीच्या सत्यत्वाचा एक उत्कृष्ट पुरावा होऊं शकेल. भौतिक शास्त्रज्ञ दृश्य सृष्टीचें संशोधन सदा करीत असतातच. सिद्धींच्या साहाय्यानें दृश्य सृष्टींतली एकादी गोष्ट संशोधकाला अगोदर कळावी, मग ती भौतिक शास्त्रज्ञांना नंतर सांपडावी, असे जर अनेक पडताळे मिळाले तर सिद्धी खऱ्या असतात व सिद्धींच्या साहाय्यानें केलेलें अदृश्य सृष्टीचें संशोधनही खरें असतें असें मानावें लागेल. थिऑसफीय संशोधकांना अदृश्य सृष्टीचें संशोधन करीत असतांना कधीं कधीं दृश्यसृष्टींतील कांहीं गोष्टी सांपडल्या आहेत व त्या शास्त्रज्ञांनीं नंतर खऱ्या ठरविल्या आहेत, असे अनेक पडताळे उपलब्ध आहेत. (उलटपक्षीं सिद्धींच्या साहाय्यानें एकादी गोष्ट सांगण्यांत यावी व मग ती चुकीची ठरावी अशीं उदाहरणें अगदीं कमी आहेत, किंबहुना जवळजवळ नाहींतच.) हे पडताळे देऊन अदृश्य सृष्टींतील संशोधन खरें अतएव श्रद्धेय असतें हें सिद्ध करण्यासाठीं आम्ही ह्या पुस्तकांतील पुढील पृष्ठें खर्चीं घालणार आहों. अदृश्य सृष्टीचें संशोधन खरें असतें अशी आमच्या वाचकांची खात्री झाल्यास ज्या थिऑसफीय चळवळीनें तें केलें आहे तिच्याविषयीं त्यांस अगत्य वाटेल, व तें संशोधन हिंदु-धर्मास (व इतर धर्मांसही) दुजोरा देत असल्यामुळें हिंदुधर्म हा मूलतः मतांच्या किंवा कविकल्पनांच्या पायावर उभारलेला नसून त्याला आधुनिक शब्दांनीं सांगावयाचें झाल्यास संशोधनाचा व जुन्या शब्दांनीं सांगावयाचें झाल्यास अनुभवाचा व अंतर्ज्ञानाचा आधार आहे हें समजून येईल.

## अंतर्ज्ञान व त्याचे पडताळे

जे लोक अदृश्य सृष्टीचें संशोधन करूं शकतात त्यांना 'अंतर्ज्ञान' असतें असें म्हणण्याचा सामान्य परिपाठ आहे. अंतर्ज्ञान म्हणजे पंच

ज्ञानेंद्रियांनीं जें दृश्य सृष्टीचें ज्ञान मिळतें त्यावेगळें योगसिद्धीच्या साहाय्यानें मिळविलेलें अदृश्य सृष्टीचें ज्ञान. थिऑसफिकल सोसायटींत कित्येक अंतर्ज्ञानी माणसें होऊन गेलेलीं आहेत. गेल्या शंभर दीडशें वर्षांत ज्या धार्मिक चळवळी जगासमोर आल्या त्यांत थिऑसफिकल सोसायटी ही एकच एक अशी चळवळ आहे कीं जीमध्यें कित्येक माणसांनीं विस्तृत प्रमाणावर आणि व्यवस्थित रीतीनें अदृश्य सृष्टीचें योगसिद्धीच्या साहृयानें संशोधन करून तें निरनिराळ्या ग्रंथांतून जगासमोर ठेविलेलें आहे. अर्थात् पडताळे मिळण्याचा प्रश्न फक्त ह्या वाङ्मयासंबंधानेंच उत्पन्न होतो; आणि म्हणून पुढील प्रकरणांत फक्त थिऑसफीय वाङ्मयांतील विधानांचे पडताळे आम्हास द्यावे लागले आहेत.[१]

थिऑसफिकल सोसायटी मॅडम ब्लॅव्हॅट्स्की व कर्नल ऑलकॉट यांनीं स्थापिली. त्या दोघांनीं अनेकवार असें सांगितलें आहे, कीं ही सोसायटी आम्हीं आमच्या स्वतःच्या जबाबदारीवर स्थापिलेली नाहीं; आज जगांत कित्येक परमज्ञानी जीवन्मुक्त पुरुष विद्यमान आहेत व त्यांच्या प्रेरणेनें आम्ही ही सोसायटी स्थापिलेली आहे. या जीवन्मुक्त पुरुषांचा पत्रव्यवहार अनेक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेला आहे. हे जीवन्मुक्त पुरुष अंतर्ज्ञानांत सर्वश्रेष्ठ होत. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की, डॉ. बेझंट, श्री. लेडबीटर, डॉ. अरंडेल, श्री. जिनराजदास वगैरे जे थिऑसफीय पुढारी, त्यांचा दर्जा त्या जीवन्मुक्तांच्या मानानें बराच खालचा आहे. पण त्यांचा दर्जा कमी असला तरी तेही अंतर्ज्ञानी होते व त्यांनींही अदृश्य सृष्टीचें फार मोठ्या प्रमाणावर संशोधन केलेलें आहे. तें त्यांच्या ग्रंथांत प्रसिद्ध

---

१. नाहीं म्हणायला स्पिरिच्युॲलिझम् (परलोकविद्या) व सायकिकल रिसर्च (चमत्कार संशोधन) या क्षेत्रांत किंचित प्रमाणांत असलें संशोधन आहे. पण जगाला माहीत नसलेली गोष्ट संशोधकानें अगोदर सांगावी व मग तिचा पडताळा मिळावा असें या क्षेत्रांत फारसें घडलेलें दिसत नाहीं. आमच्या माहितीप्रमाणें हें फक्त थिऑसफीच्या क्षेत्रांत घडलेलें आहे व म्हणून थिऑसफीय पडताळेच आम्ही या पुस्तकांत पुढें देणार आहों.

झालेलें आहे. विषयाच्या सोयीसाठीं पुढील सर्व प्रकरणांत वरील मंडळींपैकीं जरूर त्या संशोधकांची--अंतर्ज्ञानी व्यक्तींचीं--विधानें आम्ही आधारादाखल देणार आहों. दृश्य सृष्टींतली निरनिराळीं ज्ञानक्षेत्रें आम्ही पुढील पृष्ठांत विवेचनासाठीं घेत आहों.[1] आणि त्या क्षेत्रांत ज्यानें संशोधन केलें असेल त्या संशोधकाचें म्हणणें नमूद करीत आहों. मग तो संशोधक वरच्या दर्जाचा असो वा खालच्या दर्जाचा असो. अशा रीतीनें आपण निरनिराळ्या क्षेत्रांतील अंतर्ज्ञानाचे पडताळे तपासून पाहूं या.

आज धर्मामध्यें नवचैतन्य ओतणें जरूर झालेलें आहे. नुसत्या पुराणप्रियतेच्या, अभिमानाच्या किंवा भोळ्या भक्तीच्या पायावर यापुढें धर्माची इमारत चिरस्थायी होण्याचा संभव नाहीं. पुराणप्रियतेच्या, अभिमानाच्या किंवा भक्तीच्या निशाणाखालीं पुष्कळ प्राकृत लोक गोळा करतां येतील. पण आजच्या काळीं जी धर्माची नवीन मांडणी जनतेसमोर ठेवणें आवश्यक आहे, तें काम करूं शकणारी हुशार, व दूरदृष्टीचीं माणसें त्या निशाणाखालीं येण्याचा संभव नाहीं. पुष्कळ सत्यनारायण केले, भाविकपणानें भजनें केलीं, अन्नछत्रें चालविलीं, गुरुशिष्य संप्रदाय सुरू केले, तरी आज जरूर असलेली धर्माची नवीन मांडणी त्यांतून निर्माण होणार नाहीं. इतके दिवस आपण हिंदुस्थानांत वेदान्त शिकत आलों. जुन्या

१ थिऑसफिकल वाङ्मयांत अंतर्ज्ञानावर आधारलेलीं विधानें अनेक ठिकाणीं आहेत. एकाद्या ग्रंथांत असें विधान सांपडलें तर त्यांतील अंतर्ज्ञान त्या ग्रंथकाराचेंच असेल असें नाहीं. दुसऱ्या एकाद्या व्यक्तीचेंही तें असूं शकेल. उदाहरणार्थ मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या ग्रंथांत असें विधान मिळालें तर तें त्यांनीं स्वतःच्या अंतर्ज्ञानावर आधारलेलें असण्याचा संभव आहे; पण तें ज्ञान त्यांचें स्वतःचें नसून त्यांस गुरुस्थानीं असलेल्या व्यक्तींपासूनही त्यांनीं तें मिळविलें असल्याचाही संभव आहे. अंतर्ज्ञान खरें कीं खोटें हा या पुस्तकांतील मुद्द्याचा प्रश्न आहे. योगसिद्धीच्या साह्यानें तें कोणी मिळविलें व कोणी प्रसिद्ध केलें हे प्रश्न अगदीं गौण आहेत.

काळची स्थिति कशीही असो, आज वेदान्त म्हणजे एक तर्काची बुद्धिग्राह्य मांडणी आहे असें लोक समजतात. ही मांडणी बुद्धीला समाधानकारक वाटली, जीवनांतले प्रश्न सोडविण्यासाठीं जरी उपपत्ति म्हणून ती कधीं कधीं उपयोगी पडली तरी त्यांत सत्य आहे असें पुष्कळांच्या हृदय-मनाला पटत नाहीं. वेदान्ताला खरोखरीं पातंजल योगशास्त्रांतील अनुभवाचा आधार आहे. पण हल्लीं वेदान्तशास्त्र व पातंजल योगशास्त्र यांची फारकत झाली असून वेदान्तशास्त्राच्या अभ्यासूंना योगशास्त्राची माहिती नसते असें आढळून येतें. योगसिद्धींनीं माणसाला खरोखरीं अदृश्य गोष्टींचे अनुभव मिळूं शकतात, हें पुष्कळ लोकांना विदित नसल्यामुळें वेदान्त हा शब्दांचा एक पोकळ डोलारा आहे असें अनेक सुशिक्षित लोकांना वाटूं लागलें आहे. आज धर्माच्या क्षेत्रांत अनेक नवे प्रश्न समाविष्ट होऊं लागले आहेत. जगांत जे अनेक धर्म आहेत त्यांचे परस्परसंबंध कसे असणें इष्ट आहे, राजकारण अर्थकारण, नीति-अनीति, मानवी संस्कृति वगैरे क्षेत्रांत ज्या नव्या नव्या घटना घडत आहेत, त्यांबद्दल शहाण्या माणसांनीं कोणतें धोरण ठेविलें पाहिजे वगैरे नवीन प्रश्नांचा अन्वयार्थ जुन्या वेदान्ताला लावतां येईनासा झाला आहे. थिऑसफीय चळवळीनें असल्या प्रश्नांबाबत जनतेला सर्व जगभर उत्कृष्ट मार्गदर्शन केलें आहे, व मानवी उत्क्रांतीचा ओघ कोणत्या दिशेकडे चालला आहे तें दाखवून दिलें आहे. तत्संबधीं निरनिराळ्या राष्ट्रांतील जनतेचीं कर्तव्यें कोणतीं याची त्या त्या देशांत जाऊन जनतेला जाणीव करून दिली आहे. विशेषतः पुढें होणाऱ्या जागतिक घटनांत हिंदुस्थानचें कोणतें व किती महत्त्वाचें स्थान आहे तें ओळखून हिंदी जनतेचे निंदा-विरोध न जुमानतां, धर्म, अध्यात्म, समाजकारण, राजकारण, संस्कृति, यांच्या संस्था काढून त्या चालविल्या आहेत.[१]

१ या मार्गदर्शनार्थ डॉ. बेझंट यांनीं सर्व जगभर अनेक व्याख्यानें दिलीं असून त्यांतील कित्येक पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेलीं आहेत. पैकीं कांहीं

( टीप पुढील पानावर चालू )

हें सारें मार्गदर्शन अदृश्य सृष्टीच्या संशोधनावर आधारलेलें आहे. पुष्कळ सत्यनारायण करणें, मोठालीं भजनें करणें, गुरु संप्रदाय वाढविणें, यज्ञांचे प्रयोग करणें यांनीं अशा प्रकारचें मार्गदर्शन होऊं शकत नाहीं हें उघड आहे. ज्या अदृश्य सृष्टिसंशोधनाच्या पायावर हें मार्गदर्शन आधारलेलें आहे, तें संशोधन खरें असतें हें वाचकांना दाखवून त्या मार्गदर्शनाकडे त्यांचें लक्ष वेधावें व नवीन प्रश्नाचा विचार करण्यास त्यांस समर्थ करावें असा हेतु मनांत धरून आम्ही पुढील पडताळे त्यांच्यासमोर ठेवीत आहों.

---

(टीप मागील पानावरून)

पुढें दिलीं आहेत:–( 1 ) The Changing World 1909 ( 2 ) Immediate Future 1911 ( 3 ) Superhuman Men in Religion and History 1913 ( 4 ) Britain's Place in the Great Plan 1921 ( 5 ) Civilization and its Deadlocks and Keys 1924 ( 6 ) How the World Teacher Comes. 1925 (7) New Civilization 1927

## प्रकरण २ रें

# पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र

पदार्थविज्ञान व रसायन या शास्त्रांतील ज्या गोष्टी थिऑसफीय संशोधकांना अगोदर समजल्या व मग ज्या पुढें खऱ्या ठरल्या त्यांची माहिती या प्रकरणांत देण्याचा आमचा संकल्प आहे.

### विद्युत् ही काय चीज आहे?

विद्युत ही काय चीज आहे? या प्रश्नानें पुष्कळ शास्त्रज्ञांना अनेक वर्षें घोंटाळ्यांत टाकलें होतें. पण अगदीं अलीकडे त्यांना या प्रश्नाचें समर्पक उत्तर सांपडलें आहे.

या प्रश्नासंबंधानें थिऑसफिकल सोसायटीच्या संस्थापक मॅडम ब्लॅव्हॅट्स्की म्हणतात : विद्युत् ही कणांची बनलेली असेल; असेल नव्हे, विद्युत् ही कणांचीच बनलेली असते असें योगशास्त्राचें सांगणें आहे. हें विधान मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या १८८८ सालीं प्रथमतः प्रसिद्ध झालेल्या 'सीक्रेट डॉक्ट्रिन' (गूढवाद) नांवाच्या पुस्तकांत केलेलें आहे.[1]

वाळू जशी कणांची बनलेली असते, तांदळाची रास जशी तांदळाच्या असंख्य दाण्यांनीं तयार होत असते, त्याप्रमाणें विद्युत् ही चीजही कणमय व कणांपासून तयार झालेली असते असें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचें म्हणणें आहे. हें त्यांचें म्हणणें १८८८ सालीं

---

१ पहा Secret Doctine खंड १ पृ.१७१ (अड्यार आवृत्ति) तळटीप– Yet electricity may be and Occultism says it is atomic. या पुस्तकांत Secret Doctrine चे जे उल्लेख केले आहेत ते सर्व अड्यार आवृत्तींतले आहेत.

शास्त्रज्ञांस असत्य व हास्यास्पद वाटण्याजोगें होतें. वीज हा काय पदार्थ आहे या प्रश्नाचा उलगडा करण्याकरितां पदार्थविज्ञान-शास्त्रज्ञ त्या वेळीं One Fluid Theory (एकप्रवाही उपपत्ति) किंवा Two Fluid Theory (द्विप्रवाही उपपत्ति) या उपपत्ति सांगत. ते म्हणत, वीज म्हणजे वजन नसलेला शक्तिप्रवाह होय. एक-प्रवाही उपपत्तीप्रमाणें सृष्टींत वजनरहित असा एक शक्तिप्रवाह असतो, आणि तो सर्व वस्तूंत विशिष्ट प्रमाणांत भरलेला असतो. त्याचें प्रमाण वाढलें म्हणजे त्या पदार्थांत धनविद्युत् ( positive electricity ) उत्पन्न होते; प्रमाण कमी झालें म्हणजे ऋणविद्युत् उत्पन्न होते. रेशमाच्या कपड्यावर कांचेची दांडी घांसली तर दांडीमध्यें धनविद्युत् निर्माण झालेली आढळते आणि रेशमी कपड्यावर ऋणविद्युत् निर्माण झालेली आढळते. पदार्थ-विज्ञानशास्त्रज्ञ म्हणत कीं, कपडा व दांडी या दोहोंत वजन नस-लेला एक शक्तिप्रवाह स्वभावतःच नेहमी असतो. कपड्यावर दांडी घांसली कीं कपड्यावरचा कांहीं शक्तिप्रवाह दांडींत येतो. कपड्यावरची शक्ति कमी झाल्यामुळें कपड्यावर ऋणविद्युत् उत्पन्न होते व दांडींतली शक्ति वाढल्यांमुळें तींत धनविद्युत् तयार होते. द्विप्रवाही उपपत्ति (Two Fluid Theory) म्हणे कीं सृष्टींत बिनवजनाच्या अशा दोन परस्परविरुद्ध शक्ति असतात. प्रत्येक पदार्थांत त्या सम प्रमाणांत असल्यामुळें एकमेकांची वजाबाकी होऊन त्यांत कोणतीच वीज दिसून येत नाहीं. रेशमाच्या कप-ड्यांत व कांचेच्या दांडींत ह्या दोन परस्परविरोधी शक्ति सारख्या प्रमाणांत असल्यामुळें त्यांची वजाबाकी होऊन बाकी शून्य झाल्या-मुळें प्रथम कपड्यांत व दांडींत वीज दिसून येत नाहीं. पण कांचेची दांडी रेशमी कपड्यावर घांसली म्हणजे कपड्यांतील एक प्रवाह दांडींत जातो आणि दांडींत त्याचें प्रमाण वाढून तींत धनविद्युत् दिसून येते आणि दांडीतील दुसरा ( उलटा ) प्रवाह कपड्यांत जातो आणि कपड्यांत त्याचें प्रमाण वाढून त्यांत ऋणविद्युत् दिसूं लागते.

या शास्त्रीय उपपत्त्या त्या वेळीं प्रचलित असल्यामुळें वीज ही कणमय असते हें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचें म्हणणें सुशिक्षित जनतेला त्या काळीं खरें वाटू नये याबद्दल आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. द्रव्याचेच कण होऊं शकतात. कणाला थोडें तरी वजन असतें. कण थोडी तरी जागा व्यापतो. जर वीज कणांची बनलेली असेल तर वीज द्रव्याप्रमाणें जागा व्यापते, तिला लांबीरुंदी वगैरे कांहीं आकारमान असतें आणि द्रव्याप्रमाणें विजेलाही वजन असतें असें म्हणण्याची पाळी येईल. पण विजेला आकारमान नाहीं, वीज जागा (space अवकाश) व्यापीत नाहीं. विजेला वजन नाहीं, असा शास्त्रज्ञांचा त्या काळचा प्रयोगसिद्ध अनुभव असल्यामुळें वीज ही कणमय आहे, हें विधान त्यांना त्या वेळीं सहजच चुकीचें वाटलें.

त्या वेळीं शास्त्रज्ञ अखिल सृष्टीचें वर्गीकरण करून सृष्टीचीं दोन सदरें ( categories) पाडीत असत. पैकीं एका सदरांत ते द्रव्य (matter, प्रकृति) घालीत; द्रव्य कणमय असतें, द्रव्याला वजन असतें, द्रव्याला आकारमान असून तें जागा व्यापतें असें ते म्हणत. दुसऱ्या सदरांत ते शक्तीचा (energy, force) समावेश करीत. शक्ति कणमय नसते, तिला वजन नसतें, आकारमान नसतें आणि शक्ति जागा व्यापीत नाहीं असें ते सांगत. उष्णता, वीज, चुंबकशक्ति, प्रकाश, ध्वनि, गुरुत्वाकर्षण या सर्वांना ते या दुसऱ्या सदरांत घालीत. अर्थात वीज ही शक्ति असल्यामुळें ती कणमय असणें शक्य नाहीं असें त्यांस वाटे.

## अलीकडचें संशोधन

आज मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचें म्हणणें सर्वस्वीं खरें झालेलें आहे. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या निधनानंतर शास्त्रज्ञांनीं अनेक प्रयोग केले. वीज कणमय असते ही गोष्ट त्यांच्या प्रयोगानें आज सिद्ध झालेली आहे. स्थलाभावास्तव या पुस्तकांत त्या प्रयोगांची सविस्तर माहिती आम्ही देऊं शकत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें

तर असें म्हणतां येईल कीं सर वुइल्यम क्रूक्स, पेरीन लेनार्ड वगैरे शास्त्रज्ञांनीं निर्वात काचेच्या नळींत विजेचा प्रवाह सोडून पाहिला. तेव्हां विजेच्या ऋण टोकांतून ( cathode ) किरणांचा वर्षाव धन टोकांकडे (anode ) कडे जातांना त्यांना दिसून आला. या वर्षावास शास्त्रज्ञांनीं ऋणटोकाचे किरण ( cathode rays ) असें नांव दिलें. त्या काचेच्या नळींत एकादें चक्र ठेविलें तर त्या चक्रावर किरणांचा वर्षाव पडल्यामुळें तें फिरूं लागे. यावरून हा कणांचा वर्षाव आहे असें त्यांस दिसूं लागलें. या सर्व प्रयोगांचा अन्वयार्थ लावून हे कण आहेत आणि ते विद्युत्चे आहेत असें सर जे. जे टॉमसन यांनीं १८९७ सालीं निश्चित केलें.[१] ऋणविद्युत्च्या या सूक्ष्मतम कणाला शास्त्रज्ञांनीं ऋणविद्युत्परमाणु (electron ) असें नांव दिलेलें आहे. १८९६ सालीं हेन्री बेक्वेरेल या शास्त्रज्ञाला असें आढळून आलें कीं युरेनियम धातूच्या क्षारांमधून कांहीं किरण सदा बाहेर पडत असतात. त्यानंतर लवकरच पदार्थविज्ञानशास्त्रांत ‘ किरणोत्सर्जन’ (Radio-activity ) नांवाची एक नवीन शाखा निर्माण झाली. पुढें क्यूरी पतिपत्नींनीं युरेनियमच्या अशोधित धातूची मोठी रास घेऊन व तींतील इतर पदार्थ टाकून देऊन किरणोत्सर्ग करणारें रेडियम नांवाचें एक मूलतत्त्व त्यांतून वेगळें काढलें. जेव्हां एखादा पदार्थ किरणोत्सर्गी (Radio-active ) असतो. तेव्हा त्यांतून किरण बाहेर पडतात. त्याच्या संनिध लोहचुंबक नेल्यास कांहीं किरण याच्या जवळ येतात व कांहीं दूर जातात. हे किरण म्हणजे विद्युत्कणांचे प्रवाह होत, व कांहीं प्रवाह धनविद्युत्कणांचे तर कांहीं ऋणविद्युत्कणांचे

१. टीप पेलिकन मालेंतील Why Smash Atoms? या सॉलोमनकृत पुस्तकांत पुढील विधान आहे : Electricity could be described, could be generated and even accurately measured; yet the question still remained ‘ What is electricity ? ’ Finally in 1897 professor J. J. Thomson, working at Cavendish Laboratory, in Cambridge, England, gave the first definite answer—Electricity was particles. (पृ. १४)

बनलेले असतात असें शास्त्रज्ञांनीं नंतर ठरविलें. ज्याला आपण मूल-द्रव्यांचे (Elements) परमाणु (atoms) म्हणतों ते कशाचे बनलेले असतात, याचेंही संशोधन क्यूरी पतिपत्नींच्या उद्योगानंतर रुदरफर्ड, बोहर, चाडविक, अॅस्टन, मिलिकन, हान, फर्मी वगैरे किती तरी शास्त्रज्ञांनीं केलेलें आहे. आपण जसें झाडावर दगड मारून फुलें, फळें, पानें हे झाडाचे भाग खालीं पाडतों, त्याप्रमाणें परमाणूंमध्यें असलेल्या कांहीं तुकड्यांचा भडिमार सबंध परमाणूवर करून तो परमाणु फोडावयाचा व त्यापासून कोणते भागविभाग आपणांस मिळतात तें तपासावयाचें, या प्रकारचे प्रयोग मोठ्या प्रमाणावर करण्यांत आले आहेत. या सर्व प्रयोगांवरून शास्त्रज्ञांनीं आज असें निश्चित ठरविलें आहे कीं, सर्व मूल-द्रव्यांचे परमाणु विजेच्या कणांपासून बनलेले असतात. परमाणूंच्या मध्यभागीं धन-विद्युत्च्या कणांचा पुंजका असतो. या कणांना धनविद्युत्परमाणु असें नांव दिल्यास तें सार्थ होईल. त्यांना इंग्रजींत (Protons) म्हणतात. या पुंजक्यासभोवतीं वर लिहिलेले ऋण विद्युत् परमाणू निरनिराळ्या कक्षांतून प्रचंड वेगानें फिरत असतात. ऑक्सिजन, हायड्रोजन, लोखंड, सोनें, आयोडीन वगैरे जीं मूलद्रव्यें elements आहेत, त्या सर्वांचे परमाणू एकाच नमुन्याचे असतात. फक्त मध्य-वर्ती धन विद्युत्परमाणू व भोंवताली फिरणारे ऋणविद्युत् परमाणू यांच्या संख्येंत कमी अधिक असतें. एवंच द्रव्याचा परमाणु म्हणजे विद्युत्कणांची विशिष्ट घटना होय, आणि तारेंतून वहाणारी वीज म्हणजे विद्युत्कणांच्या चालत्या रांगा होत असें आज शास्त्रज्ञांनीं निश्चित केलें आहे.[1] अशा रीतीनें वीज ही कणांची बनलेली असते हें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचें विधान आज खरें झालेलें आहे.

१. ज्या कणांची वीज बनलेली असते त्यांपैकीं प्रॉटॉन व इलेक्ट्रॉन हे मुख्य होत. त्या खेरीज मेसन, पॉझिट्रॉन वगैरे आणखीही विद्युत्कण शास्त्रज्ञांस सांपडले आहेत.

## द्रव्य व शक्ति हीं एक कीं दोन ?

वर आम्ही सांगितलेंच आहे कीं कांहीं वर्षांपूर्वी रसायनशास्त्रज्ञ व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ सर्व सृष्टपदार्थांचें दोन सदरांत (categories) वर्गीकरण करीत. वजन व आकारमान असणाऱ्या सर्व वस्तूंना म्हणजे सर्व घन पदार्थ, सर्व प्रवाही पदार्थ, सर्व वायुरूप पदार्थ यांना 'द्रव्य' (Matter) या सदरांत घालीत; आणि वजन व आकारमान नसणाऱ्या गोष्टींना म्हणजे वीज, प्रकाश, उष्णता, चुंबकत्व, वगैरेंना शक्ति (force, energy, spirit) या सदरांत घालीत. हीं दोन सदरें अगदीं वेगळीं व स्वतंत्र आहेत असें ते म्हणत. हें मत चुकीचें आहे असें थिऑसफीय ग्रंथ अगदीं प्रारंभापासून सांगत आलेले आहेत. १८८२ सालीं थिऑसफिकल सोसायटीचे एक आद्य प्रवर्तक मास्टर के. एच.[१] यांनीं

---

१ मास्टर के. एच्. यांनाच कुथुमी ऋषि असें म्हणतात. हे एक जीवन्मुक्त पुरुष असून सध्यां ते तिबेटांत वास्तव्य करून राहात आहेत. संस्कृत ग्रंथातलें देवापि हें नांव त्यांचेंच आहे. त्यांच्या विषयीची परंपरागत हिंदुधर्मीय माहिती चित्रावकृत चरित्रकोशांत वाचकांस सांपडेल. ज्या दोन जीवन्मुक्तांच्या प्रेरणेनें थिऑसफिकल सोसायटी कर्नल ऑलकॉट व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की या संस्थापकद्वयांनीं स्थापिली त्यांपैकीं मास्टर के. एच. हे एक आहेत. (त्यांचा योगी श्री. अरविंद यांशीं कांहीं ऋणानुबंध असावा असें वाटतें. कारण योगी अरविंदांनीं त्यांच्यावर एक कविता लिहून प्रसिद्ध केलेली आहे.) दुसऱ्या जीवन्मुक्त पुरुषांस थिऑसफीय वाङमयांत मास्टर एम् असें नांव आहे. संस्कृतात 'मरु' असें नामाभिधान आहे. या दोन्ही जीवन्मुक्तांनीं कांहीं व्यक्तींशीं पूर्वी पत्रव्यवहार केलेला होता. त्या पत्रांपैकीं कित्येक सध्यां ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. कांहीं अड्यार येथें आहेत. कित्येक पत्रें The Mahatma Letters या पुस्तकांत A. T. Barker यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. कांहीं पत्रें थिऑसफिकल सोसायटीचे माजी अध्यक्ष सी. जिनराजदास यांनीं The Letters from the Masters of Wisdom या नांवाच्या दोन पुस्तकांत छापलेलीं आहेत.

हिंदी राष्ट्रीय सभेचे जनक मि. ए. ओ. ह्यूम यांना कांहीं पत्रें लिहिलेलीं होतीं. त्यापैकीं एका पत्रांत ते लिहितात, आमच्या सिद्धांताप्रमाणें सृष्टींत एकच तत्त्व आहे, मग त्याला Spirit-matter शक्ति-द्रव्य म्हणा किंवा उलट Matter–spirit द्रव्य-शक्ति म्हणा. द्रव्य व शक्ति अशीं दोन स्वतंत्र सदरें अस्तित्वांत नाहींत. द्रव्याचें अमुक एका पायरीपर्यंत उदात्तीभवन केल्यास ती शक्ति होईल. शक्ति घनीभूत केल्यास ती द्रव्य होईल. बर्फाचें पाणी होणें पाण्याची वाफ होऊन ती सर्वत्र पसरणें या नित्य परिचयाच्या गोष्टींसारखी ही प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया उलट दिशेनेंही होते व तसें झाल्यास वाफ, पाणी व बर्फ हे पदार्थ क्रमशः प्रकट होतात. तसें झालें म्हणजे शक्ति द्रव्यरूपांत आली, जन्मास आली असें होईल.[१] दुसऱ्या एका पत्रांत ते सांगतात कीं द्रव्य व शक्ति हीं एकच आहेत, त्यांत स्थितीचा फरक आहे. पण तत्त्वाचा नाहीं.[२]

मॅडम ब्लॅव्हटस्की यांनींही हाच मुद्दा प्रतिपादिलेला आहे. त्या लिहितात, दुसरें सदर जें द्रव्य तें काय आहे? द्रव्य म्हणजे घनीभूत

१ पहा बार्करकृत Mahatma Letters पृष्ठ १४१ आवृत्ति ८ वी:– 'Our doctrines show but one principle in nature—spirit-matter or matter-spirit....Spirit is the un-ultimate sublimation of matter, and matter, the crystallisation of the spirit. And no better illustration could be afforded than in the very simple phenomenon of ice, water, and vapour and the final dispersion of the latter; the phenomenon being reversed in its consecutive manifestations and called the spirit falling into generation or matter.

२ पहा बार्करकृत Mahatma Letters पृ. ६३ आवृत्ति ८ वी :– 'Consequently, spirit and matter are one, being but a differentiation of states and not essences.'

झालेली शक्ति. ती घन होऊन अधिकाधिक स्थूल स्वरूप धारण करते व व्यक्त स्थितींत उतरते.[१] त्यांनीं दुसऱ्या एका ठिकाणीं खनिज पदार्थांचा उल्लेख करतांना खनिज पदार्थ म्हणजे घट्ट होऊन धातुरूप धारण केलेला प्रकाश होय असें शब्द योजलेले आहेत.[२]

हा थिऑसफीय मुद्दाही हल्लीं खरा ठरला असून अंतर्ज्ञानाच्या विश्वसनीयतेचें एक गमक आपणांस त्यांत आढळण्याजोगें आहे.

आपण एक विटेचा तुकडा हातांत धरला, तर त्याला वजन असल्याचें आपणांस जाणवतें. पृथ्वी त्याला खालीं ओढते व ही ओढ म्हणजे त्या विटेच्या तुकड्याचें वजन (weight) होय असें आपण (न्यूटनच्या उपपत्तीनुसार) म्हणतों. पण आपण चंद्रावर गेलों तर चंद्र पृथ्वीपेक्षां लहान असल्यामुळें त्याची विटेला खालीं ओढण्याची शक्ति कमी असेल व म्हणून चंद्रावर विटेचें वजन कमी भरेल हें उघड आहे. पण जरी अशा प्रकारें विटेचें वजन कमी अधिक होऊं शकलें तरी ज्या द्रव्याची (मातीची) वीट बनलेली आहे तें द्रव्य कमी अधिक झालेलें नसतें. या द्रव्याला पदार्थविज्ञानशास्त्रांत 'वस्तुमान' असें पारिभाषिक नांव देतात. इंग्रजींत त्याला Mass म्हणतात. हें द्रव्य हाताला टणक लागतें. विटेचा तुकडा टेबलावर ठेवला तर तो निश्चल असतो. हातांत घेऊन फेंकल्याशिवाय तो जागचा हलत नाहीं. एकाद्यानें विटेचा तुकडा दुसऱ्याच्या अंगावर फेंकला तर मध्यें हात घालून

१. पहा The Secret Doctrine खंड २ पृ. २०४ त्याचें म्हणणें (संक्षेप करून) पुढीलप्रमाणें आहे: The other pole is matter in which spirit condenses crystallising into a more and more gross type as it decends into manifestation.

२ पहा Secret Doctrine खंड ३ पृ. १७७ इतर गोष्टींच्या वर्णनांत त्यांनीं The mineral which is light itself crystallised and immetalised असें म्हटलें आहे.

थांबविल्यावरच तो पुनः निश्चल होईल, नाहींतर तसाच त्या दिशेनें पुढें जाईल. आपोआप न हलणें, कमी अधिक टणकपणा असणें, थांबविल्याशिवाय वेग बंद न होणें हे द्रव्याचे गुणधर्म आहेत. असल्या गुणधर्मांचें द्रव्य सृष्टींत कसें निर्माण होतें? द्रव्यत्व (किंवा वस्तुमान, Mass) हें शक्तीपासून निर्माण होते असें शास्त्रज्ञांचें या प्रश्नाला आजचें नवें उत्तर आहे. एकादा पदार्थ स्थिर असला तर त्यांत द्रव्यत्व कमी असतें. त्या पदार्थाला जोराचा वेग दिला किंवा त्यांत विद्युत् घातली तर द्रव्यत्व जास्त होतें असें त्यांचे प्रयोग दर्शवितात. हा दिलेला वेग किंवा घातलेली विद्युत् नवें रूप घेऊन द्रव्य म्हणून प्रकट होतो असें त्यांचें म्हणणें आहे. अन्य शब्दांनीं हें सांगावयाचें झाल्यास शक्तीचें द्रव्यांत (Mass) रूपांतर होतें असें म्हणावें लागेल. उलटपक्षीं द्रव्याचें (Mass) शक्तींतही रूपांतर होऊं शकतें. एकाद्या मूलतत्त्वाचा परमाणु घेतला तर त्याच्या मध्यभागीं धनविद्युत्परमाणूंचा (Protons) पुंजका असतो आणि त्याच्या सभोवतीं ऋणविद्युत्परमाणू (Electrons) प्रचंड वेगानें फिरत असतात. या वेगामुळें त्या ऋणविद्युत् परमाणूंमध्यें द्रव्यत्व (Mass) उत्पन्न होतें असें शास्त्रज्ञ सांगतात. या परमाणूंपैकीं कांहीं मधल्या पुंजक्यापासून जास्त अंतरावर असून अधिक वेगानें फिरत असतात; व कांहीं मधल्या पुंजक्याच्या जवळ असून कमी वेगानें लहान वर्तुळांत फिरत असतात. असें चाललें असतांना कधीं कधीं बाहेरच्या कक्षेंतला एकादा ऋणविद्युत्परमाणु उडी मारून आंतल्या कक्षेंत येतो, तेथें त्याचा वेग सहजच कमी होतो, व वेगानें द्रव्यत्व उत्पन्न होत असल्यामुळें त्याचें द्रव्यत्वही कमी होतें आणि ह्या नष्ट झालेल्या द्रव्यत्वाचें शक्तींत रूपांतर होऊन त्यांतून नवीन शक्ति बाहेर पडते. अणुबाँबमधून जी प्रचंड शक्ति निर्माण होते ती अणूमधील कांहीं द्रव्यत्व नष्ट होऊन तिचें रूपांतर झाल्यामुळें निर्माण होते, अशी पदार्थविज्ञानशास्त्राची शिकवण आहे. याचाच अर्थ असा कीं (शास्त्रज्ञांच्या नवीन संशोधनानुसार) द्रव्य व शक्ति हे दोन स्वतंत्र वर्ग नाहींत, एकाचें दुसऱ्यांत

रूपांतर होऊन द्रव्यापासून शक्ति व शक्तीपासून द्रव्य हीं निर्माण होऊं शकतात. थिऑसफीचा सिद्धांत हाच आहे. किती द्रव्या-(Mass) पासून किती शक्ति निर्माण होईल याचें समीकरण आईन्-स्टाईन यांनीं शोधून काढलें आहे.[१]

## अणिमा सिद्धि व परमाणूंचें संशोधन

अणिमा नांवाची जी योगसिद्धि आहे तिच्या साहाय्यानें माण-साला अत्यंत बारीक पदार्थ प्रत्यक्ष दिसूं शकतात. या सिद्धीचा

१ तें असें: $E=MC^२$; E म्हणजे अर्गच्या मापानें मोजलेली शक्ति; M म्हणजे ग्रॅमच्या मापानें मोजलेलें द्रव्य (Mass); C म्हणजे सेंटिमीटरच्या मापानें मोजलेला प्रकाशाचा दर सेकंदास वेग. प्रकाशाचा वेग दर सेकंदास १,८६,००० मैल असल्यामुळें द्रव्याचा अल्पांश जरी घेतला तरी त्यापासून प्रचंड शक्ति निर्माण होते हें वरील समीकरणावरून उघड होईल. उलट पक्षीं पदार्थांत प्रचंड शक्ति (वीज, वेग वगैरे) जेव्हां घालावी तेव्हां किंचित्-मात्र द्रव्यत्व निर्माण होतें, हेंही त्या समीकरणावरून समजून येईल. शक्ति द्रव्यत्व निर्माण करूं शकते ही गोष्ट पूर्वीच्या शास्त्रज्ञांस न समजण्याचें कारण वरील विषमतेंत आहे. कल्पना करूं या कीं मालानें भरलेलें पन्नास हजार टनांचे एक गलबत समुद्रांत ताशीं २५ मैल वेगानें जात आहे. या गलबतास जी त्यांतील एंजिन्पासून पुढें जाण्याची प्रचंड शक्ति मिळते त्यानें फक्त १/२०००० ग्रेन द्रव्यांश उत्पन्न होतो असा हिशेब स्थूल मानानें सांगतां येईल !! जेव्हां दर सेकंदास १८६००० मैल जाणाऱ्या प्रकाशावर किंवा तत्सम वेगानें फिर-णाऱ्या परमाणूमधील तुकड्यावर शास्त्रज्ञांना प्रयोग करावयास मिळाले तेव्हांच शक्ति व द्रव्यत्व यांचें परस्परांत रूपांतर होऊं शकते ही गोष्ट त्यांच्या अनुभवास आली.

अलीकडे जीन्स या शास्त्रज्ञानें पुढील उद्‌गार काढले आहेत : Matter is nothing but a sort of congealed radiation travelling at less than its normal speed. (The Mysterious Universe पेलिकन माला पृ. ९८) ही उपमा व पूर्वी पृ. १९–२० वरील टिपांत दिलेल्या थिऑसफीय उपमा यांमधील साम्य आमच्या वाचकांच्या लक्षांत येईलच.

उपयोग करून रसायन शास्त्रांतल्या परमाणूंचें संशोधन थिऑसफीय पुढारी डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांनीं फार मोठ्या प्रमाणावर केलेलें आहे. १८९५ सालीं या दोघांनीं एकत्र बसून ऑक्सिजन, हायड्रोजन व नायट्रोजन वगैरे वायूंचे परमाणु प्रत्यक्ष बारकाईनें तपासले व या संशोधनाला प्रारंभ केला आणि त्यानंतर मधून मधून व जसजसा वेळ मिळत गेला त्याप्रमाणें तें संशोधन पुढें तीस पस्तीस वर्षें चालू ठेवलें. रसायनशास्त्रांत आज सुमारें नव्वदांवर मूलतत्त्वें ( Elements) नमूद आहेत. या प्रत्येक मूलतत्त्वाचा वेगळा परमाणु (atom )असतो आणि प्रत्येक परमाणूचें वेगळें वजन (atomic weight ) असतें असें रसायनशास्त्रानें ठरविलें आहे. पूर्वीं रसायनशास्त्रज्ञ म्हणत कीं प्रत्येक मूलतत्त्वाचा जो परमाणु असतो, तो लहानांत लहान असतो, आणि त्याचे त्याहून लहान तुकडे पाडणें शक्य असत नाहीं. पण अलीकडे नवीन प्रयोग करून परमाणु हा द्रव्याचा लहानांतला लहान कण नव्हे, परमाणूचेही आणखी बारीक कण पाडतां येतात व परमाणूचें अशा प्रकारें विच्छेदन केल्यास त्यांत ऋण व धन विद्युतचे कण ( Electrons and Protons ) आढळतात असा सिद्धांत त्यांनीं ठरविला आहे. रसायनशास्त्राला परमाणूचें ( atom ) अस्तित्व पूर्वीं मान्य होतें व आजही मान्य आहे, मात्र परमाणु (atom) हा प्रत्येक मूलतत्त्वाचा लहानांतला लहान कण होय, त्याचे आणखी तुकडे पाडतां येणार नाहींत असें पूर्वीं रसायनशास्त्रज्ञ म्हणत, व आज जास्त प्रयोग केल्यावर कधीं कधीं परमाणूचेही अधिक लहान तुकडे होऊं शकतात, असें ते म्हणूं लागले आहेत, असा कालतः फरक झालेला आहे. द्रव्याच्या घन, द्रव वायुरूप अशा तीन अवस्था असतात. प्रत्येक पदार्थ थंडींत घन असतो, ऊन केल्यावर तो वितळून द्रवरूप होतो व आणखी जास्त उष्णता दिल्यास तो वायुरूप होतो. या वायुरूप अवस्थेंतला द्रव्याचा सर्वांत लहान कण म्हणजे रसायनशास्त्रांतला परमाणु (Atom) होय असें म्हटलें तर चालेल.

अणिमासिद्धि प्राप्त झाल्यावर माणसाला सर्व मूलद्रव्यांचे परमाणु प्रत्यक्ष पाहतां येतात. त्या सिद्धीचा उपयोग करून माणसानें सभोंवार दृष्टि फेंकली तर त्याला ऑक्सिजन, नायट्रोजन वगैरे वायूंचें परमाणु हवेंत तरंगत असलेले दिसतात. मिठाची पूड घेतली तर तींत सोडियम व क्लोरिन यांचे परमाणु दिसतात. या सर्व परमाणूंचीं वजनें रसायनशास्त्रज्ञांनीं ताजव्याच्या साहाय्यानें काढलेलीं आहेत. उदाहरणार्थ नायट्रोजन व लोखंड यांच्या परमाणूंचीं वजनें अनुक्रमें १४ व ५६ अशीं त्यांनीं दिलीं आहेत. याचा अर्थ असा कीं हायड्रोजनच्या परमाणूचें वजन एक धरल्यास नायट्रोजन व लोखंड यांच्या परमाणूंचीं वजनें १४ व ५६ होतील.[१] नायट्रोजनचें परमाणुवजन १४ आहे म्हणजे नायट्रोजनच्या परमाणूचें वजन हायड्रोजनच्या १४ पट आहे. अणिमासिद्धि असलेल्या माणसांनाही वजनें काढतां येतात. पण त्यांचीं वजनें काढण्याची रीत रसायनशास्त्रांतल्यापेक्षां वेगळी आहे. डॉ. बेझंट व लेडबीटर यांनीं जें परमाणूचें संशोधन प्रसिद्ध केलें आहे त्यांत त्यांनीं वजनें दिलेलीं आहेत. त्यांनीं आपला असा अनुभव दिला आहे कीं हायड्रोजनचा परमाणू पाहिला तर त्यांत परस्परसदृश असे १८ लघुतम भाग आढळतात. तसेंच कोणत्याही मूलतत्त्वाचा परमाणु घेतला तरी त्या सर्वांत नक्की हेच लघुतम भाग आढळून येतात. समजा अणिमासिद्धीचा उपयोग

---

१ हायड्रोजनचें वजन १ धरल्यास ऑक्सिजनचें परमाणु वजन स्थूलमानानें १६ येतें. पण जास्त काळजीनें प्रयोग केल्यावर ऑक्सिजनचें वजन १६ पेक्षां किंचित् कमी भरते असा शास्त्रज्ञांस अनुभव आला. तेव्हां सोयीसाठीं हायड्रोजनचें वजन १ न धरतां ऑक्सिजनचें वजन १६ धरून त्यांनीं निरनिराळ्या मूलतत्त्वांचीं वजनें सांगण्याची पद्धत नंतर सुरू केली. या पद्धतीनें परमाणूवजनें सांगितल्यास आंकड्यांत किंचित्सा फरक येतो. तो तादृश महत्त्वाचा नसल्यामुळें येथें हायड्रोजन=१ हें माप स्वीकारलें आहे.

करून माणसाला एका विशिष्ट परमाणूचें वजन काढावयाचें आहे, तर तो त्या परमाणूंत वरील प्रकारचे किती भाग आहेत तें मोजील व त्यांच्या संख्येस अठरांनीं भागील; म्हणजे तो परमाणू हायड्रोजनच्या मानानें किती पट जड आहे तें समजेल. अशा रीतीनें डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांनीं पुष्कळ मूलतत्त्वांचीं वजनें काढून तीं प्रसिद्ध केलीं आहेत. संशोधन करतांना सभोंवतालच्या वातावरणांत किंवा पाण्यांत अथवा निरनिराळ्या पदार्थांत वेगवेगळ्या मूलतत्त्वांचे परमाणू त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांचे आकार निरनिराळे होते. पण ते परमाणू पाहून ते रसायनशास्त्रांत नमूद असलेल्या अमुक मूलतत्त्वांचे (Elements) परमाणू आहेत हें ओळखण्याचें त्यांस कांहींच साधन उपलब्ध नव्हतें. मिठांत सोडियमचे व क्लोरीनचे आणि पाण्यांत हायड्रोजन–ऑक्सिजनचे परमाणू आहेत हें जरी त्यांस माहीत असलें तरी सभोंवतालीं सृष्टींत त्यांना विविध आकाराचे परमाणू दिसत, पण बऱ्याच उदाहरणांत अमूक परमाणु अमूक मूलतत्त्वाचा आहे हें त्यांस प्रारंभीं सांगतां येत नसे. तेव्हां त्यांनीं त्या सर्व परमाणूंचे तुकडे केले, त्यांना अठरांनीं भागून प्रत्येकाचें वजन काढलें, व तें वजन रसायनशास्त्राच्या पुस्तकांत ज्या मूलतत्त्वाचें म्हणून दिलें असेल तें नांव त्या परमाणूला दिलें. अशा रीतीनें त्यांनीं पुष्कळ मूलतत्त्वांचीं वजनें काढून नांवनिशीवार प्रसिद्ध केलीं आहेत. उदाहरणार्थ The Occult Chemistry नांवाच्या १९०८ सालच्या (प्रथमावृत्ति) पुस्तकांत पृ. ४ व पृ. ५ वर ६५ मूलतत्त्वांची यादी त्यांनीं दिलेली आढळेल.

आश्चर्याची गोष्ट अशी कीं थिऑसफीय संशोधकांना सांपडलेलीं कित्येक मूलतत्त्वें १९०८ सालीं रसायनशास्त्रज्ञांना ज्ञात नव्हती. तीं त्यांच्या शास्त्रांत नमूद नव्हतीं. उदाहरणार्थ नीऑन नांवाचा एक वायु आहे. थिऑसफीय संशोधकांनीं आपल्या उपरोक्त यादींत तो वायु दाखल केला असून त्याच्यासमोर थिऑसफीय परमाणु वजन २० व रसायशास्त्रज्ञांचें परमाणु वजन १९.९ अशीं वजनें

दिलीं आहेत.[१] नीऑन्पेक्षां जरा जास्त वजनाचा एक वायु संशोधन करतांना थिऑसफीय संशोधकांना आढळला. त्याचा परमाणु त्यांनीं घेतला व तो विस्कटून त्यांतले तुकडे मोजले. त्यांची संख्या ४०२ (नीऑन पेक्षां ४२ नीं जास्त ) भरली व तिला १८ नीं भागून तिचें परमाणु वजन त्यांनीं २२.३३ काढलें. पण रसायनशास्त्रास ह्या परमाणु वजनाचें मूलतत्त्व त्या काळीं ज्ञात नव्हतें. तेव्हां उपरोक्त यादींत त्या वायूला त्यांनीं मेटा नीऑन् (नीऑनपेक्षां जड) असें नांव देऊन त्याच्यासमोर २२.३३ हें थिऑसफीय वजन दाखल केलें; आणि रसायनशास्त्रज्ञांना हें मूलतत्त्व अज्ञात असल्यामुळें त्यांचा वजनाचा कांहींच आकडा न घालतां नुसतीं टिंबें दिलीं. अशा प्रकारें रसायनशास्त्रास ज्ञात नसलेलीं पण थिऑसफीय संशोधनांत आढळलेलीं एकंदर आठ मूलतत्त्वें त्या यादींत दिलेलीं आहेत.

यापैकीं[२] कित्येक मूलतत्त्वें रसायनशास्त्रज्ञांस अलीकडे सांपडलीं आहेत ! !

---

१ या प्रकरणांत जीं परमाणुवजनें दिलेलीं आहेत तीं हैड्रोजनचें वजन १ धरून गणलेलीं आहेत. अलीकडे रसायनशास्त्रज्ञ ऑक्सिजनचें वजन १६ धरून गणना करतात. या दोन गणनांच्या वजनांत बारीक बारीक फरक येत असतात. Occult Chemistry च्या पहिल्या आवृत्तींत ( १९०८ ) वरील पैकीं पहिली गणना सर्वत्र स्वीकारली आहे. तिसऱ्या आवृत्तींतही तीच गणना स्वीकारली आहे. रसायनशास्त्रज्ञ हीं आपलीं वजनें पुनः पुनः प्रसिद्ध करीत असतात, व त्यांनीं अलीकडे दिलेलीं वजनें पूर्वींच्या वजनांहून किंचित् निराळीं आहेत. या पुस्तकांत या सर्व बारीक फरकांकडे दुर्लक्ष करण्यांत आलेलें आहे.

२ हें आपलें संशोधन पुढें खरें ठरेल याची संशोधकांना कल्पना होती. त्यांनीं Occult Chemistry ( 1908 ) पृष्ठ ८८ वर म्हटलें आहे : A piece of close and detailed work of this kind, although necessarily imperfect, will have its value in the future,

(टीप पुढील पानावर चालू)

## आयसोटोप

सन १९१३ च्या अगोदर रसायनशास्त्रज्ञ म्हणत कीं, कोणतेंही मूलतत्त्व (Element) कोठूनही पैदा करा, तें जर शुद्ध व निर्भेळ स्वरूपांत तुम्हांला मिळालें असेल, तर त्याचे सारे गुणधर्म व त्याचें वजन हीं एकच असणार; पण पुढें स्पेक्ट्रॉस्कोपच्या प्रयोगांत एकाच मूलतत्त्वापासून निरनिराळ्या प्रकारचे प्रकाश निघूं शकतात, हें सर जे. जे. टॉमसन यांस आढळल्यामुळें एकाच मूलतत्त्वाचे दोन किंवा अधिक प्रकार असूं शकतील ही गोष्ट शास्त्रज्ञांना संभवनीय वाटूं लागली आणि जास्त मोठ्या प्रमाणावर प्रयोग करून शास्त्रज्ञांनीं पुढें असें निश्चित ठरविलें कीं, कित्येक मूलतत्त्वांचे एकाहून अधिक प्रकार खरोखरीं असतात. प्रत्येकाचे गुणधर्म एकच, पण वजन मात्र वेगळें असतें. दोन लहान जुळीं मुलें पाहिलीं तर तीं अगदीं सारखीं दिसतात, पण त्याचें वजन मात्र एक असत नाहीं. तद्वत् कित्येक मूलद्रव्यांचें एकच गुणधर्म पण भिन्न वजन असलेले जुळ्या मुलांसारखे दोन किंवा अधिक प्रकार असतात असें शास्त्रज्ञांस दिसून आलें आहे. या प्रकारास सॉडी या शास्त्रज्ञानें १९१३ सालीं आयसोटोप असें नांव दिलें. १९०८ सालीं Occult Chemistry या पुस्तकांत जें थिऑसफीय संशोधन

---

(टीप मागील पानावरून)
when science, along its own lines, shall have confirmed these researhes. आज फक्त कांहीं थोड्या गोष्टी खऱ्या ठरल्या आहेत. कालगत्या किती तरी अधिक गोष्टींचा पडताळा मिळेल. तसा असंदिग्ध प्रकारचा पडताळा मिळून योगशास्त्रांतील संशोधन खरें असूं शकतें ही गोष्ट भविष्यकाळीं नीटपणानें सिद्ध होणें अवश्य आहे. थिऑसफिकल सोसायटीचे एक पुढारी सी. जिनराजदास यांनीं ही सारी संशोधनसामग्री संकलित करून Occult Chemistry या पुस्तकाची तिसरी आवृत्ति १९५१ सालीं प्रसिद्ध केली आहे. ती प्रसिद्ध करण्यांत त्यांचा एक हेतु हाच असला पाहिजे.

प्रसिद्ध झालेलें आहे, तें १९०७ सालीं केलेलें आहे. त्या वेळीं कोणासहि आयसोटोपच्या शक्यतेची कल्पना नव्हती आणि म्हणून थिऑसफीय संशोधकांस जीं नवीन मूलतत्त्वें आढळलीं त्यांस त्यांनीं नवीन नांवें दिलीं. पण हीं सर्व मूलतत्त्वें अजी नवीनच असतील असें नाहीं. आयसोटोपचा शोध लागल्यामुळें आपणाला असें म्हणतां येईल कीं पूर्वीं माहीत असलेल्या मूलतत्त्वांचे माहीत नसलेले वेगळ्या वजनांचे ते आयसोटोपही असू शकतील.

## शास्त्रज्ञांचे प्रयोग व पडताळे

इ. स. १९०८ सालच्या Occult Chemistry च्या पुस्तकांत थिऑसफीय संशोधनांत अगोदर सांपडलेलीं जीं मूलतत्त्वें दिलीं आहेत त्यांपैकीं कांहीं पुढें शास्त्रज्ञांस सांपडलीं असल्याचें आम्ही वर लिहिलें आहे. त्याबद्दलची थोडीशी माहिती येथें देऊन हें प्रकरण पुरें करूं या. या यादींत २० व २२.३३ या वजनांचीं नीऑन व मेटा नीऑन अशीं दोन मूलतत्त्वें थिऑसफीय संशोधकांनीं दिलीं आहेत. मेटा नीऑन हें नवीन मूलतत्त्व नसून तो एक नीऑनचा आयसोटोप आहे असें शास्त्रज्ञांनीं आतां सिद्ध केलें आहे. प्रथम या गोष्टीची अटकळ सर जे. जे. टॉमसन यांना झाली व मग ॲस्टन यांनीं ती गोष्ट निश्चित केली.[1]

वरील यादींत (शास्त्रज्ञांस अज्ञात असलेलें) 'ऑकल्टम्' नांवाचें परमाणुवजन ३ चें एक मूलतत्त्व दिलें आहे. या मूलतत्त्वाचा परमाणु १८९५ सालीं डॉ. बेझंट व लेडबीटर यांनीं तपासून पाहिला होता. तो वजनांत हलका असल्यामुळें तो हेलियमचा परमाणु आहे अशी त्या वेळीं त्यांनीं कल्पना केली. याच सुमारास हेलियम् वायूचा

---

१ टॉमसन म्हणतात, What has been called Neon is not a simple gas, but a mixture of two gases, one of which has an atomic weight of about 20 and the other about 22. (प्हा सॉलोमनकृत Why Smash Atoms? पृ. २७ पेलिकन माला)

शोध शास्त्रज्ञांनाहि लागला होता, पण त्याचें परमाणुवजन त्या वेळीं शास्त्रज्ञांनीं निश्चित केलेलें नव्हतें. बेझंट–लेडबीटर यांस १८९५ मध्यें हेलियमचा नमुना मिळूं शकला नाहीं व त्यामुळें ऑकल्टम व हेलियम हे वायु एकच आहेत कीं नाहींत तें अणिमा सिद्धीनें तपासणें त्यांना शक्य झालें नाहीं. पुढें १९०७ सालीं जेव्हां त्यांनीं अनेक नवीन परमाणूंची तपासणी केली त्या वेळीं त्यांना हेलियम वायूचा नमुना मिळाला व १८९५ सालीं तपासलेल्या परमाणूहून तो वेगळा आहे असें आढळून आलें. शास्त्रज्ञांनींही मध्यंतरीं हेलियमचें वजन ४ आहे असें ठरविलें होतें. तेव्हां परमाणुवजन ३ चें मूलतत्त्व हेलियमहून निराळें आहे असें लक्षांत घेऊन त्यांनीं १९०७ सालीं या वायूस ऑकल्टम् (Occultum) असें नांव दिलें. ऑकल्टिझम् (occultism) या इंग्रजी शब्दाचा अर्थ योगविद्या, गुप्तविद्या असा आहे. अणिमासिद्धीच्या साहाय्यानें या अज्ञात वायूचें संशोधन झालेलें असल्यामुळें त्यांनीं त्याला मुद्दाम हें नांव दिलें.[१] हें नवीन मूलतत्त्व शास्त्रज्ञांस त्यानंतर सांपडलेलें आहे. डॉ. रुदरफर्ड यांना तें १९२० सालीं सांपडलें. डॉ. रुदरफर्ड यांचे सहकारी व आयसोटोप्सच्या संशोधनांत नाणावलेले शास्त्रज्ञ एफ. डब्ल्यू. ॲस्टन यांनींही त्याचा उल्लेख केला आहे. तेव्हां अणिमासिद्धीच्या साहाय्यानें परमाणुवजन ३ चें एक मूलतत्त्व प्रथम थिऑसफीय संशोधकांस सांपडलें व मग तें शास्त्रज्ञांस सांपडलें हा पडताळा स्पष्ट आहे. शास्त्रज्ञांच्या मतें हा वायु हेलियमचा आयसोटोप असावा. थिऑसफीय संशोधक त्या

---

१ ही माहिती Occult Chemistry च्या (१९०८ आवृत्ति) पृ. २५ वर आहे. तसेंच थिऑसफिस्ट मासिकाच्या नवंबर १९३२ च्या अंकांतील Genesis of Elements या सी. जिनराजदास यांच्या लेखांत पृ. २२८ वर आहे. Occult Chemistry च्या तिसऱ्या (१९५१ च्या) आवृत्तींतही पृ. २ वर ती सारांशरूपानें दिलेली आढळेल.

परमाणूच्या अंतर्रचनेवरून तो आयसोटोप नाहीं असें म्हणतात, पण सध्यां तरी या वादाचा निकाल लागण्यासारखा नाहीं.[1]

वरील यादींत ऑरगन (Argon), क्रिप्टन (Krypton) व झेनन (Xenon) या नांवाचे तीन वायु नमूद असून त्यांचीं थिऑसफीय वजनें अनुक्रमें ३९.६६, ८१.३३ व १२७.६६ अशीं दिलेलीं आहेत. हे तीनही वायु रसायनशास्त्रास परिचित होते व आहेत. पण त्यांच्यापेक्षां वजनांत जास्ती असे आणखी तीन वायु त्या यादींत आहेत व त्यांना थिऑसफीय संशोधकांनीं मेटा-आरगन, मेटा-क्रिप्टन व मेटा-झेनन अशीं नांवें दिलेलीं आहेत. त्यांचीं थिऑसफीय वजनें ४२, ८३.६६ व १३० आहेत. हे तिन्ही वायु रसायन-शास्त्रज्ञांना तेव्हां अज्ञात होते. नंतर ते त्यांना सांपडले व त्यांचीं वजनें ४०, ८४ व १२९ अशीं रसायन शास्त्रांतील पुस्तकांत दिलेलीं आढळतात.[2] हेही आयसोटोप आहेत.

वरील यादी १९०७ सालीं केलेल्या संशोधनाची असून ती प्रथम थिऑसफिस्ट मासिकांतील लेखांत प्रसिद्ध करण्यांत आली, व

---

१ डॉ. रुदरफर्ड यांनीं रॉयल सोसायटीसमोर ता. ३–६–१९२० ला दिलेल्या व्याख्यानाचा सारांश 'नेचर' मासिकाच्या १७–६–१९२० च्या अंकांत पृ. ५०० वर आहे. त्यांत डॉ. रुदरफर्ड म्हणतात कीं "If Alpha particles are made to bombard the nucleus of Nitrogen or Oxygen atoms, particles of atomic weight 3 are liberated. नेचर मासिकाच्या ३१–१०–४२ च्या अकांत अॅस्टन यांच्या अध्यक्षते-खालच्या एका शास्त्रीय कमिटीचा रिपोर्ट दिलेला आहे. त्यांत आयसो-टोपांची माहिती आहे. त्यांत पृ. ५१५ वर पुढील विधान आहे. Evidence has been obtained by means of the Cyclotron that a stable isotope of mass 3 exists in nature.

२ पहा Mee कृत Physical Chemistry (१९३७) पृ. ९२–९३ व पार्टिंग्डन कृत A Text–Book of Inorganic Chemistry (१९४७) पृ. ४२६

मग १९०८ सालीं ते मासिकांतले लेख The Occult Chemistry (पहिली आवृत्ति) या पुस्तकांत छापले गेले. त्या यादींत १९०७ नंतर केलेलें संशोधन नमूद नाहीं. पुढें १९०९ सालीं कांहीं संशोधन करण्यांत आलें. त्यांत मासूरियम् नांवाच्या एका मूलतत्त्वाचें संशोधन झालें. त्याचें थिऑसफीय वजन १००·११ आहे. १९३१ सालीं स्पेक्ट्रॉस्कोपच्या साहाय्यानें हें मूलतत्त्वही शास्त्रज्ञांस सांपडल्याचें समजतें.[१]

वीज कणांची बनलेली असते, शक्ति थिजून द्रव्य निर्माण होतें आणि द्रव्य विरळ होऊन शक्ति निर्माण होते ही थिऑसफीय विधानें नंतरच्या शास्त्रीय शोधांनीं खरीं ठरविलीं आहेत. आयसोटोपची मूळ कल्पनाही प्रथम थिऑसफीय संशोधनांत येऊन मग रसायनशास्त्रांत आली, आणि अणिमासिद्धीच्या साहाय्यानें थिऑसफीय संशोधकांना सांपडलेलीं कांहीं मूलतत्त्वें नंतर शास्त्रज्ञांनाही सांपडलीं याबद्दलचें विवेचन या प्रकरणांत आम्ही केलें आहे. या पडताळ्यांत काकतालीय न्याय असणें शक्य नाहीं हें आमच्या वाचकांच्या ध्यानांत येईलच.[२]

---

१ पहा Occult Chemistry तृतीय आवृत्ति पृ ५३; व थिऑसफिस्ट अंक अक्टोबर १९३२ पृ. १०२ Genesis of Elements नांवाचा सी. जिनराजदास यांचा लेख. त्यावरून मासूरियम्चें थिऑसफीय संशोधन सन १९०९ सालीं झाल्याचें दिसून येतें.

२ या संशोधनाची सर्व संकलित माहिती Occult Chemistry या पुस्तकाच्या १९५१ च्या तृतीयावृत्तींत वाचकांस सांपडेल. हें पुस्तक मोठें असून त्यांत निरनिराळ्या परमाणूंचीं २३० चित्रें आहेत. व तें थिऑसफिकल सोसायटीचे माजी अध्यक्ष सी. जिनराजदास एम्. ए. व मिस प्रेस्टन एम्. एस्-सी. यांनीं प्रसिद्ध केलें आहे. याच पुस्तकाची पहिली आवृत्ति १९०८ सालीं प्रसिद्ध झालेली होती. तींत १९०७ सालीं केलेलें संशोधन आलें आहे. तसेंच १८९५ सालीं केलेल्या संशोधनाचा निबंधही त्यांत पुनर्मुद्रित

(टीप पुढील पानावर चालू)

(टीप मागील पानावरून)

केलेला आहे. हें संशोधन जसजसें होत गेलें तसतसें तें थिऑसफिस्ट मासिकामध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. या संशोधनांतल्या कोणत्या गोष्टी नंतर शास्त्रज्ञांस सांपडल्या त्याची माहिती Where Theosophy and Science Meet ह्या कांगाकृत पुस्तकांत आहे. ( पहा खंड १ पृ १६९–१७७ व पृ. ३३८ ते ३४१ आवृत्ति दुसरी) ह्या संशोधनासबंधानें सी. जिनराजदास यांनीं Occult Chemistry Investigations नांवाची एक छोटी पुस्तिका प्रसिद्ध केलेली आहे. त्यांतही या संशोधनाची रूपरेषा वाचकांस मिळेल. त्यांत त्यांनीं एफ. डब्ल्यू. ॲस्टन यांस लिहिलेल्या पत्राची नक्कल छापली आहे. ॲस्टन हे आयसोटोपच्या संशोधनांत अग्रेसर असून त्यांना त्यांच्या ह्या संशोधनाबद्दल १९२२ सालीं नोबेल परितोषिक देण्यांत आलेलें होतें. ॲस्टन साहेबांस लिहिलेल्या पत्रांत जिनराजदास यांनीं थिऑसफीच्या अणिमा सिद्धीनें केलेल्या संशोधनाची थोडक्यांत माहिती देऊन या संशोधनाचें वाङमय आपण नुसतें नजरेखालून घालावें, तें दाखविण्याकरितां मी आपणांस भेटूं इच्छितों, त्यासाठीं मी येऊं का, असें विचारलें होतें. पण ॲस्टन यांनीं जिनराजदास यांस पुढीलप्रमाणें नकारार्थक उत्तर पाठविलें. 'Dr. Aston thanks Mr. Jinarajdasa foi sending his communication of Jan. 8, and begs to return the same without comment as he is not interested irn Theosophy.' या उत्तरावरून शास्त्रज्ञांच्या मनांत इतर मार्गांनीं केलेल्य संशोधनाबल यत्किंचित्‌ही जिज्ञासा नसते हें उघड दिसतें!

## प्रकरण तिसरें

# खगोल शास्त्र

या प्रकरणांत ज्योतिःशास्त्रांतील कांहीं प्रश्न घ्यावयाचे आहेत.

### सूर्य हा कोणत्या प्रकारचा गोल आहे ?

सूर्यासिंबंधानें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं अंतर्ज्ञानाच्या आधारावर लिहिलें आहे कीं, आपला सूर्य हा एक विस्तवाचा जळता गोळा आहे, या म्हणण्यास योगशास्त्राचा विरोध आहे. मास्टर के. एच. यांनींही आपल्या १८८२ सालच्या एका पत्रांत म्हटलें आहे कीं, सूर्य घन-पदार्थाचा बनलेला नाहीं, तो द्रव पदार्थाचाही बनलेला नाहीं, तो तेजाळणाऱ्या वायूचाही बनलेला नाहीं. तो विद्युत्-चुंबक प्रेरणांचा प्रचंड गोल आहे.[1]

मॅडम ब्लॅव्हॅट्स्कींच्या वेळीं सूर्याविषयीं शास्त्रज्ञांचीं अनेक मतें होतीं. सूर्य हा एक विस्तवाचा जळता गोल आहे असें एक मत होतें. पण जर सूर्याएवढी कोळशाची रास जळत ठेविली तर पांच किंवा सहा हजार वर्षांत त्या कोळशाची सर्व राख होऊन सूर्याचा

---

१. मॅडम ब्लॅव्हॅट्स्कीकृत सीक्रेट डॉक्ट्रिन (अड्यार आवृत्ति) खंड २ पृ. २६४ वर पुढील विधान आहे : Occult philosophy denies that the Sun is a globe in combustion. हा ग्रंथ प्रथम १८८८ सालीं प्रसिद्ध झाला. बार्कर यांनीं प्रसिद्ध केलेल्या Mahatma Letters (आवृत्ति ८) पृ. १६५ वर मास्टर के. एच. यांचें १८८२ सालचें एक पत्र आहे. त्यांत ते लिहितात : The Sun is neither a solid nor a liquid nor yet a gaseous glow, but a gigantic ball of electro-magnetic forces.

फडशा होईल असें हिशेबानें दिसूं लागलें. तेव्हां तें मत मागें पडलें.[१] एकादा वायुरूप पदार्थ चेपून लहान केला तर तो उष्णता निर्माण करतो असा अनुभव आहे. तेव्हां सूर्य हा आंतील गुरुत्वाकर्षणानें दबून लहान होणारा वायूचा गोळा आहे असें मत हेल्महोल्टझ् या शास्त्रज्ञानें प्रसृत केलें. पण सूर्यापासून इतकी उष्णता बाहेर पडते कीं असल्या दाबानें निर्माण होणारी उष्णता तिच्या पासंगासही पुरणार नाहीं, हें शास्त्रज्ञांस पुढें दिसून आल्यावर तेंही मत मागें पडलें. हर्शल यांचें मत सूर्य हा थंड व काळा गोल असून त्याच्या सभोंवतीं तेजस्वी ढगांचा थर आहे असें होतें.[२] अशीं निरनिराळीं मतें वातावरणांत असतां वेळीं त्यांचा इनकार करण्यासाठीं वरील थिऑसफीय विधानें करण्यांत आलीं आहेत हें वाचकांनीं विसरूं नयें.

---

१ पहा Gamow कृत Birth and Death of the Sun (१९५३) मेंटर बुकमाला पृ. ११, १३; ८९ व १४३.

जेव्हां कोळशासारखा पदार्थ जळतो तेव्हां कोळशांतला कार्बन व हवेंतला ऑक्सिजन हे परस्परांस ओढीत असल्यामुळें त्या दोहोंचा कार्बन-डायॉक्साईड वायु तयार होतो, व त्यामुळें ज्वलनक्रिया शक्य होते. पण सूर्यावर उष्णतामान फार आहे. त्या उष्णतामानांत कार्बन व ऑक्सिजन परस्परांस ओढीत नाहींत इतकेंच नव्हे तर परस्परांस दूर लोटतात आणि ज्वलनासारखी क्रिया होऊं शकत नाहीं. पृथ्वीवर अनेक संयुक्त पदार्थ (Compounds) आहेत; उष्णतामान पुष्कळ झाल्यास त्यांतील मूलतत्त्वें परस्परांस दूर लोटून सुटीं होतात. सूर्यावर प्रचंड उष्णता असल्यामुळें संयुक्त पदार्थ निर्माण करणारी कोणतीही ज्वलनासारखी क्रिया सूर्यावर शक्य नाहीं असें आढळलें आहे. वरील मत मागें पडण्याचें हेंही एक कारण आहे.

२ पहा. Life on Other Worlds हें जोन्स यांचें पुस्तक पृ. ३३ मेंटर पुस्तकमाला (१९५४).

## सूर्य कशाचा बनलेला आहे ?

सूर्यापासून किती उष्णता बाहेर पडते याचा शास्त्रज्ञांनीं हिशेब केला आहे. ज्वलनक्रियेनें किंवा दाबानें जितकी उष्णता निर्माण होईल त्याच्यापेक्षां सूर्यापासून निघणारी उष्णता अनेक पटींनीं जास्त आहे. ही कोठून येते ? हा प्रश्न प्रारंभीं शास्त्रज्ञांस सुटेना. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की दिवंगत झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं बेक्वेरेल या शास्त्रज्ञानें किरणोत्सर्गी (radio-active) द्रव्यें शोधून काढलीं व त्यांतून एकसारखी शक्ति बाहेर पडते हें पाहिलें. पुढें आणखी संशोधन होऊन किरणोत्सर्गाच्या प्रक्रियेंत परमाणु फुटत असतात असें दिसून आलें; आणि द्रव्याचा परमाणु फुटला तर त्यांतून प्रचंड शक्ति बाहेर पडते हें शास्त्रीय प्रयोगांनीं सिद्ध झालें. सूर्याच्या पृष्ठभागावरचें उष्णतामान ६००० डिग्री सेंटिग्रेड आहे असें शास्त्रज्ञांनीं मापून निश्चित केलें आहे. इतक्या उष्णता-मानांत ज्वलनक्रिया अशक्य असून सर्व वस्तु पृथक्-कृत होत अस-तात. सूर्याच्या मध्यभागीं गुरुत्वाकर्षणाचा दाबही प्रचंड असल्या-मुळें चुरमुरा दाबल्यास त्याचें जसें पीठ होतें तद्वत् त्या दाबानें सूर्याच्या पोटांतील द्रव्याच्या परमाणूंचा चुराडा होतो, आणि परमाणु फुटल्यामुळें त्यांत जी प्रचंड शक्ति असते ती सुटी होऊन, उष्णतारूपानें सूर्यापासून सर्व अंतराळांत उधळली जाते, असें आज शास्त्रज्ञांनीं ठरविलें आहे. सूर्याच्या पोटांत द्रव्याचा चुरा होत असल्यामुळें सूर्य घन नाहीं, द्रव नाहीं, वायुरूप नाहीं, तो परमाणूंच्या आंतील विद्युत्-चुंबक प्रेरणा (Electro-magnetic forces) सर्वभर सोडणारा एक गोळा आहे असें जें मास्टर के. एच. यांनीं १८८२ सालीं सूर्याचें वर्णन केलें होतें तें वर लिहिल्याप्रमाणें आज खरें ठरलें आहे.

थिऑसफिकल सोसायटीच्या पूर्वेतिहासांत मि. सिनेट नांवाचे एक पुढारी प्रसिद्ध होते. त्यांनीं लिहिलेल्या Growth of the Soul ह्या पुस्तकांत आपल्या सूर्यमालेंतल्या ग्रहांसंबंधानें पुढील उद्गार काढलेले आहेत: खरोखरी उत्क्रांति-

दृष्टया नेपचूनशीं ऋणानुबंध असलेले दोन ग्रह आपल्या सूर्यमालेंत विद्यमान आहेत. ते अद्यापि दुर्बिणीच्या तावडींत सांपडलेले नाहींत. त्यांतला एक शास्त्रज्ञांना त्यांच्या नेहमीच्या उपकरणांनीं सांपडण्यासारखा आहे. पण सर्वांत बाहेरचा जो ग्रह आहे तो मात्र त्या उपकरणांच्या टप्प्याच्या पलीकडे आहे.[१]

इ. स. १९३० सालीं ज्योतिःशास्त्रज्ञांस प्लूटो नांवाचा नेपचूनच्या पलीकडे असलेला एक नवीन ग्रह सांपडल्यामुळें हें म्हणणें आज खरें झालेलें आहे!

## प्लूटोचा शोध

लोवेल नामक एक प्रसिद्ध ज्योतिःशास्त्रज्ञ अमेरिकेंत होऊन गेला. त्यानें पाहिलें कीं नेपचून व यूरेनस हे ग्रह आपापल्या कक्षेंत हिशेबाप्रमाणें फिरत नाहींत. हिशेबाच्या मानानें हे ग्रह ४.५ सेकंड अलीकडे-पलीकडे आढळतात. तेव्हां त्यांना विचलित करणारा दुसरा एक ग्रह असावा अशी त्याला शंका आली व गणिताप्रमाणें तो कोठें असावा तें ठरवून त्यानें त्या जागेचे वेध घेण्यास सुरुवात केली. पुढें लोवेल मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या हाताखालीं काम करणाऱ्या टॉमबॉग या शास्त्रज्ञानें तें संशोधन

१. पहा सिनेटकृत Growth of the Soul (१८९६) पृ. २७१ : "Connected in evolution with Neptune, there are in fact two other planets, physically belonging to our system that have not yet fallen prey to telescopic research. One of them may ultimately be discovered by ordinary means; but the outermost lies far beyond the range of physical instruments."

मि. सिनेट हे स्वतः अंतर्ज्ञानी नव्हते; पण कित्येक जीवन्मुक्तांशीं त्यांचा पत्रव्यवहार असे. त्या पत्रव्यवहारांत त्यांना ज्या अंतर्ज्ञानाच्या गोष्टी समजत त्यांचा आधार घेऊन त्यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. वरील विधान त्या पत्रव्यवहारावर आधारलेलें असावें असें दिसतें.

एकसारखें सुरू ठेवलें. तारा आकाशांत स्थिर असतो. पण ग्रह सूर्याभोंवतीं फिरणारा असल्यामुळें तो आज अमुक ताऱ्याजवळ तर कांहीं दिवसांनीं दुसऱ्या ताऱ्याजवळ असें स्थलांतर करीत असलेला आढळतो. इ. स. १९३० सालच्या मार्च महिन्यांत टॉमबॉग यानें आकाशांतील एका विशिष्ट जागेचे दुर्बिणीनें फोटोग्राफ घेतले. एक फोटो २ मार्चला व दुसरा ५ मार्चला असे तीन दिवसांच्या अंतरानें घेतले. तेव्हां एक विशिष्ट आकाशस्थ ज्योती त्या तीन दिवसांत पूर्वींची जागा सोडून दुसरीकडे गेलेली त्याला आढळली. अशा रीतीनें या नव्या ग्रहाचा त्याला शोध लागला. हा ग्रह स्थूल मानानें मंगळा एवढा आहे. शास्त्रज्ञांनीं त्याला **प्लूटो** असें नांव दिलें आहे.[1]

नेपच्यून व युरेनस यांच्या कक्षेंत जी चलबिचल होते तिचा सर्व हिशेब केवळ प्लूटोच्या गुरुत्वाकर्षण शक्तीनें लागत नाहीं. तेव्हां प्लूटोच्या पलीकडे आणखी एक ग्रह असावा असा कांहीं शास्त्रज्ञांचा आजही कयास आहे ! !

वर निर्दिष्ट केलें आहे कीं मि. सिनेट यांचा कांहीं जीवन्मुक्त पुरुषांशीं १८८२ च्या सुमारास पत्रव्यवहार सुरू होता. मि. सिनेट त्यांना कधीं प्रश्नरूपानें माहिती विचारीत, व ते जीवन्मुक्त ती त्यांना उत्तरीं देत. अशा तऱ्हेची माहिती संकलित करून मि. सिनेट यांनीं थिऑसफीवर कांहीं पुस्तकें त्या काळीं लिहून प्रसिद्ध केलीं आहेत. एकदां मि. सिनेट यांनीं त्यांना पुढील प्रश्न विचारला : आजच्या खगोलशास्त्राला ज्या ग्रहांची माहिती आहे त्याखेरीज अन्य ग्रहांचा शोध त्या शास्त्रांतील उपकरणांनीं शास्त्रज्ञांना लावतां येईल का? या प्रश्नाला मास्टर के. एच्. यांनीं जें उत्तर दिलें आहे त्याचा सारांश असाः—

---

1 Marvels and Mysteries of Science या E. Hawks यांच्या पुस्तकांत पृ. ५५ वर हे फोटो वाचकांस पहावयास मिळतील. या संशोधनाची माहिती Draper and Lockwood यांच्या Story of Astronomy या पुस्तकांत सांपडेल.

शास्त्रज्ञांना आपल्या उपकरणांनीं ह्या नवीन ग्रहांचा शोध लावतां आला पाहिजे. बुधाच्या कक्षेच्या आंत जे ग्रह आहेत तसेंच नेपचूनच्या कक्षेजवळ जे ग्रह आहेत त्या सर्वांचा शोध अद्यापि खगोलशास्त्रज्ञांना लागलेला नाहीं. हे ग्रह अस्तित्वांत आहेत व ते कोठें आहेत यांचें आम्हांस ज्ञान आहे. न दिसणारे असे आणखी अनेक ग्रह अस्तित्वांत आहेत. ते ग्रह सध्यां बांधले जात असल्यामुळें अद्यापि ते चकाकूं लागले नाहींत. 'आम्हांला ज्ञान आहे' असें आम्ही म्हटलें तरी शास्त्रज्ञांस तो गोष्ट कबूल नसल्यामुळें खगोलशास्त्रास आमच्या ज्ञानाचा कांहींच उपयोग नाहीं. कित्येक ताऱ्यांपासून आणि ग्रहांपासूनही निघणाऱ्या प्रेरणा (Radiations) अदृश्य असल्यामुळें ते तारे दिसत नाहींत व म्हणून ते शास्त्रज्ञांस सांपडलेले नाहींत. ग्रह दिसण्याच्या पूर्वीं त्या ग्रहांपासून शास्त्रज्ञांना अगोदर आवाज ऐकूं येतील. ही माझी भविष्य वाणी आहे.[1]

१. बार्करकृत The Mahatma Letters (आवृत्ति ८) यांत पृ. १४६ वर सिनेट यांचा प्रश्न (क्र. १४) दिलेला आहे व त्याला मास्टर के. एच. यांनीं पाठविलेलें उत्तर पृ. १६९–१७० वर आहे. प्रश्न पुढीलप्रमाणें आहे : 'Could any other planets besides those known to modern astronomy be descovered by physical instruments if properly directed?' उत्तरांतील शब्द त्यांतील अवांतर गोष्टी गाळून पुढीलप्रमाणें आहेत : 'They must be. Not all of the Intra-Mercurial planets nor yet those in the orbit or Neptune are yet discovered, though they are strongly suspected. We know that such exist and where they exist and that there are innumerable planets, 'burnt out' they say, in obscuration we say, planets in formation and not yet luminous etc. But then 'we know' is of little use to science when even the Spiritualists will not admit our knowledge.' ह्या वाक्यापुढें एडिसननें त्या वेळीं काढलेल्या एका यंत्राबद्दलचा उल्लेख आहे. असलें यंत्र काय करील तें पुढील शब्दांत सांगितलें आहे. It will detect by

(टीप पुढील पानावर चालू)

वरील उत्तरांत सांगितलें आहे कीं शास्त्रज्ञांना आज ज्ञात नसलेले ग्रह व तारे त्यांना पुढें त्यांच्याच उपकरणांनीं सांपडण्याजोगे आहेत, आणि बुध व सूर्य यांच्यामध्यें व नेपचूनच्या कक्षेसभोवतीं शास्त्रज्ञांना न उमगलेले ग्रह आहेत. यांपैकीं नेपचूनच्या कक्षेपलीकडला एक ग्रह दुर्बिणीनें शास्त्रज्ञांस कसा सांपडला व त्याच्या पलीकडे आणखी एक ग्रह असल्याची ज्योतिर्विदांना कशी शंका आहे या विषयींची माहिती वर आलीच आहे. अनेक ग्रह सध्यां तयार होत आहेत, पण रात्रीं अद्यापि ते चकाकूं लागले नसल्यामुळें ते दिसत नाहींत. कांहीं ताऱ्यांपासून ज्या प्रेरणा (Radiations) बाहेर येतात त्या अदृश्य असल्यामुळें ते तारेही दिसत नाहींत. त्या ग्रहताऱ्यांपासून प्रथम शास्त्रज्ञांना ध्वनि ऐकूं येतील व मग शास्त्रज्ञांना त्यांची ओळख पटून त्यांचा शोध लागेल असा या उत्तराचा सारांश आहे.

अलीकडे दुर्बिणीच्या साहाय्यानें ज्योतिर्विदांनीं जें आकाशाचें निरीक्षण केलें आहे त्यांत अशा दोन चिजा त्यांना आढळल्या आहेत कीं ज्या प्रकाश देत नाहींत, आणि म्हणूनच दिसत नाहींत. आकाशांत कांहीं स्थळीं तेजोमेघ (Nebula) दिसतात. त्यांचे दोन प्रकार आहेत. फार दूरच्या ताऱ्यांचा थवा कधीं कधीं चकचकीत दिसतो. मोठ्या दुर्बिणींतून असला तेजोमेघ पाहिला तर तो मेघासारखा न दिसतां त्यांत सुटे तारे दिसतात. दुसऱ्या प्रकारच्या तेजोमेघांत सुटे तारे दिसत नाहींत, पण तेजाळलेला पट्टा दिसतो. सूर्यप्रकाश ढगांवर पडून जसे ते ढग तेजस्वी झालेले आपणांस दिसतात, त्याप्रमाणें ताऱ्यांचा प्रकाश सभोंवतालच्या विरळ द्रव्यावर पडून त्या द्रव्याचे तेजस्वी पट्टे आपणांस दिसतात. अशी या प्रकारच्या तेजो-

---

(टीप मागील पानावरून)

their invisible radiations stars that are unseen and otherwise undetectable; hence planets also,...... Science will hear sounds from certain planets before she sees them. This is a prophesy.

मेघांची माहिती ज्योतिःशास्त्रानें सांगितलेली आहे. हे दोन्ही प्रकार म्हणजे प्रकाशमान तेजोमेघ होत. यांखेरीज प्रकाश न देणारा असा कृष्णवर्णी तेजोमेघ (Nebula) शास्त्रज्ञांस अलीकडे सांपडला आहे. विस्तवांतून निघालेला धूर जसा काळा असतो, आणि त्या धुराच्या पलीकडे असलेल्यां जिनसेला तो जसा झाकून टाकतो, त्याप्रमाणें अंतराळांत काळ्या वर्णाचे तेजोमेघ आहेत, व ते आकाशांतल्या कांहीं ताऱ्यांना झाकून टाकीत असतात याचा त्यांना शोध लागलेला आहे. त्यांना काळे तेजोमेघ (Dark Nebula) असें नांव देण्यांत आलेलें आहे.[१]

## अदृश्य ग्रह व तारे

न दिसणारे तारेही ज्योतिर्विदांना अलीकडे सांपडले आहेत. त्यांसंबंधानें एका ज्योतिर्विदानें म्हटलें आहे– Stars still smaller than the Sun in their early stages possess such low luminosities and surface temperatures that they are practically invisible.[२]

आपण कोळशाची शेगडी पेटविली म्हणजे प्रारंभीं शेगडींतून धूरच जास्त निघतो आणि विस्तव अगदीं लहान, ज्वाला बिलकूल नाहींत व उष्णताही थोडी अशी सुरवात होते. पुढें धूर कमी होतो. ज्वाळा उफाळूं लागतात. त्यांचा प्रकाश दिसूं लागतो आणि उष्णताही वाढते. त्यानंतर विस्तव कमी व्हावयास लागतो आणि प्रकाश, ज्वाला, उष्णता या सर्वांचें प्रमाण हळूहळू उतरत जातें. आणखी कांहीं वेळानें प्रकाश आणखी कमी होतो, पण उष्णता तितकीशी एकदम कमी होत नाहीं. आणि जळजळीत निखारे

---

१ असल्या तेजोमेघांचे फोटोग्राफ क्रोथरकृत An Outline of the Universe खंड १ (पेलिकन माला) व गॅमॉवकृत The Brith & Death of the Sun मेंटॉर माला यांत दिले आहेत.

२ पहा गॅमॉवकृत Birth & Death of the Sum पृ. १३४ मेंटॉरमाला आवृत्ति १९५३

शेगडींत दिसतात. नंतर त्या निखाऱ्यांची हळूहळू राख होते आणि शेवटीं विस्तव विझून जातो. विस्तव जसा ह्या अनेक अवस्थांतून जातो तद्वत् तारेही स्वाभाविकपणें कांहीं ठराविक अवस्थांतून जातात असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. तारा म्हणजे प्रारंभीं थंड व विरळ द्रव्याचा अवाढव्य गोळा असतो. त्यांतील द्रव्यावर गुरुत्वाकर्षणाचा परिणाम होऊन तो गोळा पुढें दबून लहान होतो आणि त्यामुळें त्याचें उष्णतामान वाढतें. उष्णता वाढून ती विशिष्ट मर्यादेपर्यंत आली म्हणजे आंतील द्रव्यांचे परमाणु फुटून कांहीं प्रक्रिया सुरू होतात. त्यांनीं उष्णतामान आणखी वाढतें, आणि दबून लहान होण्याची क्रिया बंद पडते. या स्थितींत तारा कांहीं काळ काढतो. मग ज्या द्रव्याचे परमाणु फुटत होते तें द्रव्य संपतें व पुनः तारा दबून लहान होऊं लागतो. त्यामुळें उष्णता आणखी वाढते. मग दुसऱ्या एका मूलतत्त्वाचे अणु फुटूं लागून दुसऱ्या प्रक्रिया सुरू होतात आणि अशा कांहीं स्थित्यंतरांतून गेल्यावर अंतीं हैड्रोजनचें द्रव्य फुटूं लागून नष्ट होतें, तारा थंड होऊन दिसेनासा होतो, व शेवटीं त्याचें नांवही उरत नाहीं. अशीं ताऱ्यांचीं स्थित्यंतरें ज्योतिर्विदांनीं सांगितलीं आहेत.

आज आकाशांत दिसणारे सर्व तारे वरील अवस्थांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी अवस्थेंत आहेत असें जोतिःशास्त्रज्ञ म्हणतात. या अवस्थांवरून त्यांनीं ताऱ्यांना Red Dwarfs, Blue Giants, Red Giants, White Dwarfs अशीं नांवें दिलीं आहेत. पैकीं Red Dwarfs व Red Giants हे तारे प्रारंभींच्या अवस्थांत असून कधीं अंधुक दिसतात व कधीं बिलकूल दिसत नाहींत. आणि अंतिम अवस्थेमध्यें सर्वच दिसेनासे होतात असें त्यांचें सांगणें आहे.[1]

---

१ जास्त माहितीकरितां गॅमॉव कृत The Birth and Detah of the Sun हें पुस्तक पहा. Red Dwarf हा तारा पुढें मोठा तेजस्वी होतो त्याला मग Blue Giant म्हणतात. कांहीं तारे प्राथमिक अवस्थेंतही आकारमानानें प्रचंड असतात त्यांना Red Giant हें नांव आहे. ते पुढें आकारानें अगदीं लहान पण तेजस्वी होतात. मग त्यांना White Dwarf असें म्हणतात.

ज्योतिःशास्त्रज्ञांच्या ह्या उपपत्त्या कांहींही असल्या तरी न दिसणारे तारे व न दिसणारे तेजोमेघ अंतराळांत असल्याचें शास्त्रज्ञांस प्रत्यक्ष आढळून आलेलें आहे ही गोष्ट निश्चित आहे.

कांहीं संशोधकांनीं अलीकडे दुर्बिणीला एरियलसारखी तार जोडून तींतून आकाशांतले ध्वनि ऐकूं येतात कीं काय याचें संशोधन केलें आहे. सर्व ताऱ्यांतून कांहीं विशिष्ट प्रकारचीं आंदोलनें बाहेर पडतात व तीं वरील प्रकारच्या दुर्बिणींत ध्वनीच्या रूपानें ऐकूं येतात असा त्यांस अनुभव आला आहे. या संशोधनास मि. के. जी. जान्स्की यांनीं सुरुवात केली, आणि न दिसणारे सुमारें शंभर नवीन तारे ध्वनीच्या साहाय्यानें शोधून काढले. संशोधनाची ही नवीन शाखा अलीकडे सुरू झाली असून तिला Radio-Astronomy असें नांव मिळालें आहे. तारे दिसण्याच्या अगोदर माणसांना त्यांचे ध्वनि ऐकूं येतील हें मास्टर के. एच्. यांनीं केलेलें भविष्य अशा प्रकारें आज सत्य सृष्टींत उतरलेलें आहे.[१]

---

१ थिऑसफिस्ट मासिक, अंक एप्रिल १९५३, पृ. ४५ वर Fulfilled Prophesy नांवाचा एक लेख Adolfo De La Pena Gil यांचा आहे. त्यावरून ही माहिती येथें घेतली आहे. जास्ती माहितीसाठीं तो लेख पाहावा. The British Association for the Advancement of Science या संस्थेची वार्षिक सभा इ. स. १९५३ च्या सप्टेंबरांत सर एडवर्ड ॲपलटन यांचे अध्यक्षेखालीं लिव्हरपूल येथें भरली होती. अध्यक्षांनीं आपल्या आरंभीच्या भाषणांत प्रकाश न देणारे पुष्कळ तारे रेडिओ–दुर्बिणीनें शास्त्रज्ञांस सांपडले असल्याचा जाहीर उल्लेख केला. हे तारे आवाजावरून शास्त्रज्ञांना ओळखूं येतात पण साध्या दुर्बिणींतून दिसत नाहींत याबद्दलची कांहीं अधिक माहिती थिऑसफिस्ट मासिक मे १९५३ च्या अंकांत A Note on the Dark Stars या लेखांत दिलेली आहे.

प्रकरण ४ थें

# प्राचीन इतिहास व उत्खनन

या प्रकरणांत भूगर्भशास्त्र व पुराण वस्तुसंशोधनशास्त्र यांत येणाऱ्या कित्येक प्राचीन काळच्या गोष्टींचा विचार करावयाचा आहे.

## ॲटलँटिस् खंड

जगाचा नकाशा पाहिल्यास युरोपमधील ग्रेट ब्रिटन, फ्रान्स, स्पेन, पोर्तुगाल व आफ्रिकेंतील मोरोक्को या देशांच्या पश्चिमेस अटलांटिक महासागर दिसतो व अटलांटिक महासागराच्या पलिकडे या देशांच्या समोर पश्चिमेस कॅनडा व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें दिसतात. दोन्ही बाजूंच्या या देशांच्यामध्यें--जेथें आज अटलांटिक महासागराच्या लाटा हेलावत आहेत तेथें—पूर्वी एक मोठा देश होता, किंवा एक मोठें खंडप्राय बेट होतें असें थिऑसफीय अंतर्ज्ञान सांगतें. प्रारंभीं तो देश अतिविस्तीर्ण होता. नंतर कालवशात् ज्वालामुखींचे स्फोट, भूकंप, जलप्रलय वगैरे आपत्तींनीं त्यांतला कांहीं भूमिभाग हळूहळू पाण्याखालीं जाऊन शेवटीं एक मोठें बेट शिल्लक राहिलें. मूळच्या देशास थिऑसफीनें रूत (Ruta) असें नांव दिलें आहे. शवटीं शिल्लक राहिलेल्या बेटास पॉसिडोनिस् असें नांव दिलें जातें. हें बेट साडेअकरा हजार वर्षांपूर्वी एकदम बुडालें. आतां तेथें अटलांटिक महासागराच्या लाटा तांडव नृत्य करीत आहेत, व त्या बेटांतील उंच गिरिशिखरें आज पाण्याच्या वर दिसत असून आपण त्यांस अझोर्स बेटें म्हणतों असें थिऑसफीचें म्हणणें आहे. हा वेळोवेळीं पाण्यांत बुडालेला जो विस्तीर्ण

व सबंध भूमिभाग त्यास अटलँटिस असेंही नांव देण्यांत येतें?[१] आज या गोष्टीचा पडताळा येत आहे व प्राचीन काळीं या जागीं अटलँटिस देश होता असें सांप्रतचे शास्त्रज्ञही म्हणूं लागले आहेत मि. ल्युईस स्पेन्स नांवाचा एका प्रसिद्ध ग्रंथकार आहे. त्यानें सर्व शास्त्रीय पुरावा गोळा करून जो निष्कर्ष काढला आहे, तो सारांश रूपानें पुढीलप्रमाणें आहे. तो म्हणतो : शास्त्रीय पुरावा विचारांत घेतल्यास अटलँटिस खंड अस्तित्वांत असल्याचें सिद्ध होतें असें मला वाटतें. फार प्राचीन काळीं त्या जागीं अटलँटिस खंड होतें हें प्रत्येक अधिकारी भूगर्भशास्त्रवेत्त्याला मान्य होत आहे. पण तें कोणत्या काळीं होतें व केव्हां नष्ट झालें याबद्दल मात्र त्यांच्या मध्यें वेगवेगळीं मतें दिसून येतात.

मि. पीरी टर्मियर (Director of Science of the Geological Chart of France) यांचें म्हणणें असें कीं अटलँटिक महासागराच्या

---

१ सध्यां जेथें अटलांटिक महासागर आहे तेथें प्राचीन काळीं जमीन होती असें प्लेटोनें म्हटलें आहे व प्लेटोच्या काळापासून ही दंतकथा जगभर पसरलेली आहे. थिऑसफीय संशोधकांनीं योगसिद्धीच्या साहाय्यानें पूर्वीं निरनिराळ्या काळीं समुद्र व जमीन यांबाबत कोणकोणते फेरबदल पृथ्वीवर झालेले होते याची माहिती प्राप्त करून घेतली; आणि वरील दंतकथेंत सत्य असल्याचें ठरविलें आहे. The Story of Atlantis या स्कॉट–इलियट कृत थिऑसफीय पुस्तकांत या प्राचीन काळच्या जमिनीचे व समुद्रांचे नकाशे प्रथम प्रसिद्ध करण्यांत आले. जिरानजदासकृत First Principles of Theosophy या पुस्तकांतही ते लहान करून प्रसिद्ध करण्यांत आलेले सांपडतील. मॅडम ब्लॅव्हट्स्की यांचा The Secret Doctrine, बेझंट,–लेडबीटर यांचा Man, वगैरे ग्रंथांत जुंन्या अटलांटिस् खंडाची माहिती आलेली आहे. जरी वरील दंतकथा फार पूर्वींची असली तरी अंतर्ज्ञानाच्या साहाय्यानें थिऑसफीय संशोधकांनीं तिच्याबद्दलचें संशोधन करून तिला वरीलप्रमाणें निश्चित स्वरूप दिलें आहे. यासाठीं हा पडताळा थिऑसफीय संशोधनाचा आहे असें आम्ही येथें म्हणत आहोंत.

तळची जमीन ही ज्वालामुखींनीं भरलेली असल्यामुळें पूर्वी ती जमीन वर आलेली असावी. डब्लिनचे प्रो. आर. एफ. शार्फ यांचें मत असें आहे कीं पोर्तुगाल, मदिरा व अझोर्स बेटें, मोरोक्को, कॅनरीज बेटें, सेंट हेलिना बेट या सर्वांचा पूर्वी एक देश असावा, पुढें त्याचा दक्षिण भाग अंशतः हळूहळू समुद्रांत बुडून उत्तरेचा भाग कांहीं काळ वर राहिला असावा, नंतर तो पोर्तुगालपासून अलग होऊन व पाण्याखालीं जाऊन अझोर्स व कॅनरी बेटें हे त्याचे अवशेष राहिलेले असावे. प्रो. एडवर्ड हल्ल यांचें म्हणणें असें आहे कीं पृथ्वीच्या पूर्व व पश्चिम गोलार्धांतील प्राणी व वनस्पति यांमधील साम्य पाहिल्यास सध्यांच्या अटलँटिक समुद्राच्या जागीं पूर्वी जमीन असावी व तेथून या वनस्पति व हे प्राणी पूर्व व पश्चिम गोलार्धांत परस्परविरुद्ध दिशेनें पसरत गेलेले असावे. अटलॅंटिक महासागरांत जीं बेटें आहेत त्यांतील व युरोपांतील सरपटणारे प्राणी, तसेंच भूमध्य समुद्रांतील व कॅनरी बेटांतील प्राणी, यांमध्यें साधर्म्य असल्याचें मि. टी. व्ही. वॉलॅटसन् यांनीं दाखवून दिलें आहे. उत्तर आफिरका, स्पेन, पोर्तुगाल व कॅनरी बेटें यांतील गोगलगाई एकमेकांसारख्या दिसतात; तेव्हां हे भाग सलग असावे असें प्रो. सिमरोथ म्हणतात. यूरोप व अमेरिका या अटलॅंटिक समुद्राच्या दोन बाजू आहेत. दोन्हीकडचे जमिनीवरचे शंख पाहिल्यास यूरोप व अमेरिका यांस जोडणारा जमिनीचा भाग प्राचीन काळीं निश्चितपणें अस्तित्वांत असला पाहिजे असें डॉ. डब्ल्यू कोबेल्ट यांचें मत आहे. यूरोपांतील मोलस्क प्राणी आणि अटलँटिक महासागरांतील बेटावरील मोलस्क प्राणी यांमध्यें जें सादृश्य दिसतें त्याचा उलगडा करावयाचा असल्यास यूरोपखंडाची जमीन त्या बेटांशीं पूर्वी लागलेली होती असें मानणें भाग आहे. हें मत डॉ. फॉन इहेरिंग (Dr. Von. Ihering) यांनीं प्रकट केलें आहे. शास्त्रज्ञांचीं वरील मतें विचारांत घेऊन मि. स्पेन्स यांनीं असा मथितार्थ काढला आहे कीं, अगोदरच्या काळीं यूरोप व अमेरिका यांस जोडणारी जमीन असावी, पुढें भूकंप-ज्वालामुखी यांनीं या

मधल्या जमिनीची लहानमोठीं अनेक बेटें केलीं असावीं, त्यांतलीं दोन फार मोठीं व खंडप्राय असावीं, पैकीं एक यूरोपच्या जवळ असावें, दुसरें अमेरिकेच्या जवळ असावें, कालगत्या दोन्ही प्रदेश फुटून पाण्यांत बुडाले असावे, आजचीं अझोर्स बेटें हे एकाचे अवशेष असावेत व वेस्ट इंडीज् बेटें दुसऱ्याचे अवशेष असावेत.[1]

युरोप व अमेरिका यांमधील अटलँटिक महासागराच्या तळची जमीन किती खोल आहे याचीं मोजमापें चालेंजर व डोलफिन या गलबतांनीं घेतलेलीं आहेत. पृ. ४८ लगतच्या चित्रांत तीं दिलीं आहेत. त्या चित्रांवरून दिसतें कीं, पोर्तुगालच्या किनाऱ्याजवळील जमीन एकदम खालीं गेलेली आहे. संयुक्त संस्थानांच्या किनाऱ्यावरील जमीनही एकदम खालीं गेलेली आहे. जर येथें अटलांटिक महासागरांत पूर्वी जमीन नसेल व जर ती नंतर बुडालेली नसेल, तर या दोन्ही किनाऱ्यांजवळील पाण्याखालच्या जमिनीची उतरण बेतशीर असावयास पाहिजे. आपण समुद्राच्या काठाशीं उभे राहून भरती ओहोटी पाहिली तर कांठाची जमीन हळू हळू पाण्यांत उतरत गेलेली दिसते. तसें या चित्रांत नाहीं. दोन्ही टोकांस जमिनीचा उतार एकदम प्रचंड आहे. त्यावरून पोर्तुगाल व अमेरिका यांमध्यें पूर्वी एक खंड होतें, या म्हणण्यास पुरस्कार मिळतो.

## गोबी वाळवंटांतील समुद्र

आम्ही वर थिआसफीचें म्हणणें दिलेंच आहे कीं, युरोप व उत्तर अमेरिका यांमध्यें प्राचीन काळीं मोठा भूप्रदेश होता, तो पुढें

---

1 Miss Preston कृत The Earth and its Cycles. (१९५४) या पुस्तकांत मि. ल्यूईस स्पेन्स् यांची विचारसरणी दिलेली आहे (पृ. ७३--७९) वरील सारांश आम्ही त्या पुस्तकावरून घेतला आहे. अॅटलँटिसच्या अस्तित्वाचा शास्त्रज्ञांनीं गोळा केलेला कांहीं जुना पुरावा स्कॉट ईलियट कृत The Story of Atlantis (१८९६) नामक पुस्तकांत आढळेल (पृ. ३-१६)

फुटत फुटत कमी झाला आणि शेवटीं त्या जागीं पोसिडोनिस नांवाचें एक विस्तीर्ण बेट शिल्लक राहिलें, हें बेट हजारो वर्षें अस्तित्वांत होतें व जलप्रलय होऊन शेवटीं तें सुमारें अकराहजार पांचशें वर्षांपूर्वी एकदम समुद्रांत गडप झालें. त्या वेळीं समुद्राची एक पर्वतप्राय लाट सर्वत्र पसरली, आणि आज जसे जगांत समुद्र व देश दिसत आहेत ती भूगोलरचना तयार झाली. तें बेट बुडण्यापूर्वी आपल्या पृथ्वीवर जी जमीन व पाणी यांची मांडणी होती तिचा नकाशा थिऑसफीच्या पुस्तकांत दिलेला आहे. हा नकाशा थिऑसफीय संशोधक मि. लेडबीटर यांना अंत. र्ज्ञानाच्या जोरावर उपलब्ध झाला होता व तो प्रथम १८९६ सालीं मि. स्कॉट ईलियट यांच्या The Story of Atlantis ह्या पुस्तकांत प्रसिद्ध करण्यांत आला.[१] ह्या नकाशाचें निरीक्षण केल्यास बेट बुडण्याच्या अगोदर काय स्थिति होती त्याची कल्पना आमच्या वाचकांना येऊं शकेल. त्या वेळीं जे मुख्य फरक होते ते असे : इंग्लंड, फ्रान्स, स्वीडन, नार्वे यांचा एक संलग्न भूमिभाग होता, आणि इंग्लिशखाडी, उत्तर समुद्र व बाल्टिक समुद्र हे अस्तित्वांत नव्हते. सहारा वाळवंटाच्या जागीं समुद्र होता. युरोप व अमेरिका यांच्यामध्यें अटलँटिक महासागराच्या मध्यभागीं पोसिडोनिस बेट होतें. आज कास्पियन समुद्र, काळा समुद्र यांसारखे जसे चारी बाजूंनीं भूमिवेष्टित असे समुद्र आहेत तसा चीन–तिबेटच्या उत्तरेस सध्यांच्या गोबी अरण्याच्या जागीं एक विस्तीर्ण समुद्र होता. पॉसिडोनिस बेट बुडाल्यावर हें सर्व बदलून हल्लींची स्थिति आपल्या पृथ्वीवर निर्माण झाली.

अंतर्ज्ञानावर आधारलेल्या वरील गोष्टींपैकीं गोबीच्या अरण्यांतील समुद्राविषयीं अलीकडे भरभक्कम पुरावा मिळाला आहे.

---

१ हा नकाशा मि. लेडबीटर यांनीं कोठून मिळविला त्याची माहिती श्री. जिनराजदास कृत Occult Investigations या पुस्तकांत पृ. ३२--३४ वर दिलेली आहे.

स्वेन हेडिन नांवाचे एक सुप्रसिद्ध मुशाफर आहेत. सन १९२९ सालीं गोबीच्या अरण्याच्या आसपास संशोधनार्थ ते एक प्रवासी पथक घेऊन गेले होते. डॉ. एरिक नोरिन नांवाच्या एक भूगर्भ-शास्त्रज्ञास त्यांनीं आपल्या बरोबर नेलें होतें. त्या प्रवासांत त्यांना तिबेट व चीन या देशांच्या उत्तरेस सध्यांच्या लॉप् नॉर जवळ सुकून गेलेल्या प्राचीन समुद्राची जागा[१] आढळली. समुद्र सुकला म्हणजे ती पाण्याची खोलगट जागा वेगळी दिसते व पूर्वीचा तो समुद्र कोठें होता त्याची हद्द ओळखून काढतां येते. जुन्या समुद्रानें अतिविस्तीर्ण प्रदेश व्यापलेला होता. त्याच्या पश्चिम टोका-जवळील भागांत हिंडून डॉ. नोरीन यांनीं त्या टोकानें व्यापलेल्या भूमिभागाची पहाणी केली व त्या जागेचा नकाशा १९३२ सालीं प्रसिद्ध केला. या जागेचें क्षेत्रफळ सुमारें इंग्लंड देशाएवढें आहे. डॉ. नोरिन यांनीं काढलेला नकाशा व थिऑसफीय अंतर्ज्ञानानें काढलेला नकाशा असे दोन्ही पुढील पानावर आम्ही दिलेले आहेत. थिऑसफीय नकाशा गोबी अरण्यांत प्राचीन काळीं असलेल्या सबंध समुद्राचा आहे. डॉ. नोरिन यांनीं काढलेला नकाशा म्हणजे त्या समुद्राच्या फक्त पश्चिम टोंकाचा भाग आहे. आणि पश्चिम टोंकही संपूर्णपणें डॉ. नोरिन यांच्या नकाशांत आलेलें नाहीं.

---

१ याची माहिती American Geographical Review १९३२ पृ. ५९१-५९८ मध्यें प्रथम आली. ती नेव्हिन ड्रिकवाटर यांच्या Corroborations of Occult Archeology (१९३५) नामक पुस्तकांत पृ. २९ वर पुढीलप्रमाणें दिलेली आहे. Dr. Norin has discovered that in the late Glacial times the whole of the Tarim basin was filled by an enormous lake or inland sea, a mediterranean sea, of whose great volume of water the historical lake of Lap Nor is the last disappearing survival. ही माहिती ड्रिकवॉटर यांनीं कांगाकृत Where Theosophy and Science Meet (१९४९ खंड १ पृ. १०६) या पुस्तकांत लिहिलेल्या Archeology नामक निबंधातही आढळेल. आम्ही ती ड्रिकवाटर यांच्या लिखाणांतून येथें उद्धृत केली आहे.

डॉ. एरिक नोरिन यांनीं काढलेला नकाशा खालीं दिला आहे. त्यांत प्राचीन समुद्राचा त्यांनीं तपासलेला भाग टिपक्यांनीं किंचित् काळसर केलेला आहे. हे रेखांश बाणांनीं नकाशाचे वर दाखविले आहेत. अक्षांश ४० ची रेषा या समुद्रामधून जाते.

खालीं दिलेला नकाशा गोबी वाळवंटांतील सबंध प्राचीन समुद्राचा थिऑसफीय नकाशा होय. वरील अक्षांश रेखांशांच्या ठिकाणीं जें पश्चिम टोक दाखवलें आहे तेवढ्याचाच नकाशा डॉ. नोरिन यांनीं काढला आहे. थिऑसफीय नकाशांतील प्राचीन टोक व त्या टोकाचा डॉ. नोरिन यांनीं काढलेला नकाशा यांत आकारमानाचें विलक्षण साम्य आहे हें कोणालाही समजेल.

पृ. ४६ वर वर्णन केलेली अटलँटिक महासागराच्या खालची जमीन किती खोल आहे त्याची माहिती खालील नकाशावरून समजेल. खोली मीटरच्या मापांत दिलेली आहे. पोर्तुगाल व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांच्यां किनाऱ्यालगतची जमीन पाण्यांत एकदम खोल गेलेली उघड दिसते.



दोन्ही नकाशांत अक्षांश रेखांश दिलेले आहेत. नकाशांच्या स्केल-पट्ट्या वेगळ्या आहेत, हें ध्यानांत ठेवून दोन्ही नकाशे निरखून पाहिले तर थिऑसफीय नकाशांतील पश्चिम टोकाच्या अग्र-भागाची कांहीं जमीन डॉ. नोरीन यांनीं तपासलेली नाहीं, व ती त्यांच्या नकाशांत दाखवलेली नाहीं हें आमच्या वाच-कांस समजून येईल. डॉ. नोरीन यांनीं या प्राचीन समुद्राचा शोध लावल्यामुळें थिऑसफीय संशोधनाची सत्यता सिद्ध झाली आहे. •नुसतें त्या प्राचीन समुद्राचें अस्तित्व सिद्ध झालें आहे इतकेंच नाहीं, तर अक्षांश रेखांशांनीं दर्शविलेली समुद्राची जागाही एकच आहे व त्या समुद्राच्या पश्चिम टोकाचा किनारा व त्याचा एकंदर आकार ह्याचें दोन्ही नकाशांत इतकें विलक्षण साम्य आहे कीं, तें सहजासहजीं निर्माण झालें आहे असें म्हणण्यास वाव नाहीं!

## इराणचें प्राचीन राज्य

प्राचीन इतिहासाचे आणखी कांहीं पडताळे पाहूं या. डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांच्या Man: Whenec, How and Whither या सन १९१३ सालच्या पुस्तकांत इराण-इराकच्या प्राचीन इति-हासाची माहिती दिलेली आहे.[१] ती अशी: इसवी सनापूर्वीं सुमारें तीस हजार वर्षांच्या सुमारास इराणमध्यें मध्य आशियांतून आर्य लोक येऊन त्यांनीं तेथें एक साम्राज्य स्थापलें व तें साम्राज्य, मधून मधून त्यांत उन्नति-अवनतीचे कालखंड आले असले तरी तें इ. सनापूर्वीं २२००पर्यंत[१] म्हणजे सुमारें अठ्ठावीस हजार वर्षें टिकलें. या प्रदीर्घ काळामध्यें त्यांतील जनतेच्या संस्कृतीची पातळी

१ उपरोक्त पुस्तक (आवृत्ति पहिली १९१३) प्रकरण १८ मध्यें पुढील वर्णन आहे: With certain changes the Empire lasted until about 2200 B. C. In the twentyeight thousand years of the Persian Empire, there were naturally many fluctuations. During most of this long period, they kept high level of civilization and many relics of their mighty architecture lie buried beneath desert sands. (पृ. ३०३, ३०४)

सामान्यतः उच्च असे. त्यांनीं त्या काळीं मोठमोठीं बांधकामें केलीं होतीं व तीं आज जमिनीच्या पोटांत दडून राहिलेलीं आहेत.

याच दोन ग्रंथकर्त्यांच्या Lives of Alcyone या पुस्तकांत वरील साम्राज्याची कांहीं अधिक माहिती दिलेली आढळते. ह्या देशांत ज्या नद्या होत्या त्यांचें पाणी वाळवंटांत जिरून नष्ट होत असे व त्यामुळें देशांत पाण्याची फार टंचाई भासत असे. त्यास उपाय म्हणून हें साम्राज्य स्थापल्यावर राजानें देशांत लगेच प्रचंड प्रमाणावर मोठमोठे कालवे बांधविले. कालव्यांच्या पाण्यामुळें शेती चांगली होऊं लागली व देश संपन्न झाला. ही कालव्यांची योजना जनतेला इतकी उपयुक्त वाटली कीं, त्यांनीं राजाला प्रेमादरानें 'जलदाता' असें नांव दिलें अशी त्यांत माहिती आहे.[१]

इराणचें राज्य[२] जेव्हां स्थापण्यांत आलें तेव्हां सभोंवतालच्या रानटी लोकांच्या टोळ्या त्यांच्यावर वारंवार हल्ले करून त्या

---

१ पहा Alcyone's Lives(खं.१पृ.१३७)As the country was on the whole barren and many of the rivers lost themselves in the sands, the Manu had devised an elaborate scheme of irrigation. The project was on so great a scale, that it needed the effort of several generations to realise it completely. So important was the work considered that one of the many poetic titles which the affection of the people conferred upon the king was 'the giver of water'.

२ आम्ही सोयीसाठीं जरी 'इराणचें राज्य' असे शब्द वापरलेले असले तरी त्या राज्याचा विस्तार पुष्कळच अधिक होता. पूर्वीं ज्या देशाला मेसापोटेमिया म्हणत व आज ज्याला इराक म्हणतात तोही भाग या राज्यांत समाविष्ट असे. सध्यांच्या इराण देशाभोंवतालचेही अनेक प्रदेश या राज्यांत मोडत असत. ज्या वाचकांना या साम्राज्याची जास्त माहिती हवी असेल त्यांनीं Man : Whence, How and Whither या पुस्तकांतील The Third Sub-race-The Iranian नांवाचें अठरावें करण व Alcyone's Lives खंड १ मधील (जन्म ९ वा) पृ. १३६–१४१ हा भाग वाचावा.

राज्यास उपद्रव देत असत. त्या रानटी लोकांचा बंदोबस्त करण्याकरतां इराणी लोक आपल्या सैन्याची विशेष प्रकारची रचना करून त्या रानटी लोकांना जेरीस आणीत. सेनापतीनें हुकूम दिला कीं सैनिक एकदम त्या रचनेनुसार उभे रहात. सैनिकांनीं खेटून एकमेकांशेजारीं वर्तुळाकार रांगांनीं उभें रहावयाचें, अगदीं बाहेरच्या रांगेंतल्या सैनिकांपाशीं छोटे भाले असावयाचे, मागच्या रांगांतल्या त्या शिपायांपाशीं लांब भाले असावयाचे, आणि त्यांच्या पाठीमागच्या रांगांपाशीं धनुष्यबाण असावयाचे आणि शत्रूनें हल्ला केला कीं ही रचना न मोडतां जुडग्यासारखी बंदिस्त ठेवावयाची अशी त्यांची युद्धाची पद्धत असे. शत्रूवर हल्ला करते वेळीं एकदम ही वाटोळी रचना बदलून पाचरेसारख्या आकाराची रचना केली जाई. अशा प्रकारचे व्यूह करून इराणी सैनिक परस्परांस खेटून उभे राहात व रचना न मोडतां शत्रूंशीं लढत.[१] सैनिकांनीं आठदहा रांगा करून खेटून उभें रहावयाचें. पुढच्या रांगांतील सैनिकांपाशीं छोटे भाले असावयाचे. मागच्या रांगापाशीं अधिकाधिक लांब भाले असावयाचे व युद्धांत हा गट मोडूं द्यावयाचा नाहीं ही युद्धाची पद्धत प्रथम मॅसिडोनियन लोकांनीं काढली व पुढें प्राचीन ग्रीक लोकांनीं ती त्यांच्यापासून उचलली असें हल्लींचे इतिहासज्ञ म्हणतात. या सैनिकी रचनेला फॅलँक्स (Phalanx) असें नांव आहे. ही फॅलँक्सची रचना मॅसिडोनियन लोकांच्या हजारों वर्षें अगोदरच्या इराणी लोकांत प्रचलित होती असें थिऑसफीय अंतर्ज्ञानाचें म्हणणें आहे.

## फॅलँक्सची रचना व कालवे

या दोन्ही गोष्टींचा (कालव्यांची योजना व फॅलँक्सची पद्धत) पडताळा आज मिळालेला आहे.

---

१ या रचनेचें अधिक वर्णन The Lives of Alcyone खंड १ पृ. १३८–१३९ वर दिलेलें आहे.

इतिहासज्ञांची आतांपर्यंतची माहिती पुढीलप्रमाणें होती: प्राचीन काळीं इराक-इराण देशांत ॲसिरियन व बॉबिलोनियन किंवा (खाल्डियन) अशीं दोन राज्यें होतीं. असीरियन राज्याची राजधानी निनिव्हे होती. हल्लींच्या मोसूल शहराजवळ हें जुनें निनिव्हे शहर होतें. बॅबिलोन शहर हें हल्लींच्या हिल्ला शहराजवळ होतें. व तें बॅबिलोनियन राज्याचें राजधानीचें शहर असे. हीं दोन्ही राज्यें प्रभावी होऊन गेलीं. दोघांची सुरवात इ. सनपूर्व २२०० च्या सुमारास झाली. त्यांच्यांत सदा युद्धाच्या कटकटी सुरू असत. कधीं या पक्षास जय मिळे. कधीं त्या पक्षास जय मिळे; आणि कधीं बॅबिलोनचें राज्य बलिष्ठ असावें तर कधीं ॲसिरियाचें राज्य बलिष्ठ असावें असा चक्रनेमिक्रम चाले. हीं दोन्ही राज्यें बऱ्याच शतकानंतर, म्हणजे इ. सन पूर्व ५००–६०० च्या आसपास, इतिहासाच्या पटावरून नष्ट होऊन लयास गेलीं, हीं दोन्ही राज्यें सेमेटिक (हिब्रू, ज्यु) वंशीय लोकांचीं होतीं. तीं अस्तित्वांत येण्याच्या अगोदर इराणांत कोणाचें राज्य होतें याची माहिती इतिहासज्ञांना नव्हती. बॅबिलोनियन राज्याच्या दक्षिणेकडील प्रांतांत कोणी 'सुमेरी' लोक होते, हे सेमेटिक वंशाचे नव्हते व हीं दोन राज्यें अस्तित्वांत येण्याच्या अगोदर इराणांत त्या जागीं हे सुमेरी लोक असत इतकीच माहिती इतिहासाला होती.

अगदीं अलीकडे जें उत्खनन करण्यांत आलेलें आहे त्यावरून या सुमेरी लोकांची माहिती इतिहासज्ञांना उपलब्ध झाली असून या उपरोक्त दोन्ही राष्ट्रांच्या अगोदर त्यांच्याहूनही अधिक सुसंस्कृत व अधिक प्रभावी असें सुमेरियन राज्य इराणांत होतें हें सिद्ध झालें आहे. हें उत्खनन अनेक ठिकाणीं करण्यांत आलेलें आहे. सुमेरियन राज्याच्या राजधानीचें शहर 'ऊर' हें होतें. या शहराची जागा यूफ्रेटीस नदी इराणच्या आखातास जेथें मिळतें तेथें सध्यां असलेल्या बसरा शहरापासून फारशा अंतरावर नाहीं. येथें झालेलें उत्खनन जास्त महत्त्वाचें आहे. हें उत्खनन करण्यास पेन्सिल्व्हॅनिया युनिव्हर्सिटी व ब्रिटिश म्यूझियम या दोघा संस्थांनीं

सर लिओनार्ड वूले यांच्या नेतृत्वाखालीं एक पथक पाठविलें होतें व या लोकांनीं त्या जागीं सन १९२२ ते १९२९ पर्यंत उत्खनन केलें. या उत्खननांत त्यांना सुमेरियन लोकांचें राजधानीचें शहर सांपडलें, व त्या शहरांतील निरनिराळ्या वस्तूंवरून सुमेरियन लोकांचा व त्यांच्या राज्याचा इतिहास आज उपलब्ध झालेला आहे. ही माहिती सर लिओनर्डि वूले यांनीं The Sumerians नांवाच्या (व इतर कित्येक) पुस्तकांत प्रसिद्ध केली आहे.

या उत्खननांत सुमेयरिन लोकांची कालव्यांची योजना प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस आली. या योजनेसंबंधानें सर लि. वूले लिहितात कीं, कालव्यांचें पाणी शेतांत सोडण्याची व्यवस्था शिताफीनें आंखलेली होती व त्यानें शेतांत व कालव्यांच्या बाजूस धान्य, भाजीपाला, फळफळावळ यांचीं उत्तम पिकें सुमेरियन लोक काढीत असत. कालव्यांची बांधबंदिस्ती करण्याची जबाबदारी सामुदायिक रीतीनें शेतमालकांवर टाकलेली होती. पाणी देण्या-घेण्यासंबंधानें वाद उत्पन्न होत असत आणि सुमेरी सरकार त्यांचा निकाल लावीत असे.[1]

सर ऑरेल स्टाईन हे एक प्रसिद्ध उत्खननकार आहेत. त्यांनींही बलुचिस्थान व इराणचा पूर्व भाग यांत उत्खनन केलेलें आहे, व त्यांनाही ठिकठिकाणीं कालवे काढण्याकरितां प्राचीन काळच्या लोकांनीं पाणी अडविण्यासाठीं बांधलेले बांध जमिनींखालीं आढळून आलेले आहेत.[2]

---

१ पहा वूलेकृत The Sumerians पृ. ११२–११४ "The carefully irrigated fields produced amazing crops of barley, spelt, onions and other vegetables along the canal banks. वर दिलेली अधिक माहितीही या स्थळीं वाचकांस सांपडेल.

२ पहा Where Theosophy and Science Meet (द्वितीयावृत्ति सन १९४९) या पुस्तकांतील ड्रिंकवाटर यांचा Archeology नामक लेख पृ. ११३

असीरियन-बॅबिलोनियन राज्यांच्या अगोदर जें हें इराण-इराकमध्यें राज्य होतें तें इ .सनपूर्व २२००च्या सुमारास नष्ट झालें ही थिऑसफीय अंतर्ज्ञानाची माहिती वर दिलीच आहे. उत्खनन करून इतिहास लिहिणाऱ्या संशोधकांनीं म्हटलें आहे कीं इ. सनपूर्व २१७० मध्यें बॅबिलोनियन लोकांनीं युद्धांत सुमेरियनांना हरविलें,[1] त्यांच्या राजास कैद करून नेलें व अशा रीतीनें सुमेरियन राज्याचा शेवट झाला. यावरून कोणत्या काळीं सुमेरियन राज्य लयास गेलें त्याबद्दल अंतर्ज्ञानानें जें विधान केलेलें होतें तेंही खरें ठरलें हें स्पष्ट आहे.

सुमेरियन लोक फॅलँक्सची रचना करून लढत असत या म्हणण्याचा पडताळाही वूले यांस उत्खननांत मिळाला आहे. त्यांना सांपडलेल्या अवशेषांत एक फॅलॅक्सची कोरीव आकृति उपलब्ध झालेली आहे. त्यांत भाले घेतलेल्या माणसांच्या दहा रांगा खेटून उभ्या असलेल्या दिसत आहेत; आणि सुमेरियन लोक तशी रचना करून लढत असत असें वुले यांनीं विधान केलेलें आहे. वरील आकृतीचें Ennatum advances at the head of his phalanx अशा शब्दांनीं त्यांनीं वर्णन केलें आहे.[2]

---

१. ही माहिती वरील उत्खननासंबंधींच्या New Light on Ancient Ur नामक मॅलोवन यांच्या लेखांत दिलेली आहे. पहा National Geographical Magazine अंक जानेवारी १९३० आणि Where Theosophy and Science Meet (द्वितीयावृत्ति सन १९४९) या पुस्तकांतील ड्रिंकवॉटर यांचा Archeology नामक लेख पृ. ११० व ११५.

२ ही आकृति वूलेकृत The Sumerians या पुस्तकांत पृ. ५४ च्या समोर छापलेली आहे.

## आर्य-पूर्व हिंदुस्थान

आणखी एक मुद्दा घेऊं. आर्यांचा हिंदुस्थानांत शिरकाव होण्याच्या पूर्वी हिंदुस्थानांत कोणाची वस्ती होती ? आर्य लोक हिंदुस्थानांत येण्याच्या अगोदर हिंदुस्थानांत गोंड, संताळ, भिल्ल, रामोशी, कातोडी वगैरे अनार्य लोक होते, ते अर्धवट रानटी व सर्व बाबतींत मागासलेले होते; त्यांच्या मानानें आर्यलोक सर्व दृष्टींनीं सुधारलेले होते, बुद्धिमान् होते, त्यांना कला येत होत्या, शेती करतां येत होती, व म्हणून त्यांनीं या अनार्यांना जिंकलें, आणि त्यांना मागें हटवून हिंदुस्थानांत आपलें आसन स्थिर केलें असें इतिहासज्ञ इतके दिवस म्हणत असत.

थिऑसफीय संशोधन याच्या अगदीं विरुद्ध आहे. त्या संशोधनावरून असें दिसतें कीं हिंदुस्थानांतली पूर्वीची अनार्य जनता आर्य लोकांसारखीच सुधारलेली होती; पण ती जनता सुस्त, आळशी व विलासी असल्यामुळें आर्यांच्या स्वाऱ्यांसमोर तिला टिकाव धरतां आला नाहीं. नुसता रहाणीचा दर्जा पहावयाचा झाला तर अनेक बाबतींत आर्यांच्या पेक्षां त्यांचा दर्जा कांकणभर अधिकच होता. त्या अनार्यांचीं मोठमोठीं राज्यें होतीं. राज्यकार्य-धुरंधर लोक त्यांचा कारभार चालवीत. धर्माच्या क्षेत्रांतही हुषार व बुद्धिमान् लोक होते. Alcyone's Lives या पुस्तकांतील संशोधन १९०९ च्या सुमारास करण्यांत आलेलें आहे. त्या पुस्तकांतील २१ व्या जन्माचें वर्णन वाचल्यास त्या काळीं धर्माची स्थिति कशी होती, धर्माची शिकवण काय होती, देवळें कोणत्या प्रकारचीं असत, याची माहिती वाचकांस मिळू शकेल.[1] त्या वेळीं त्रिमूर्ति होती, नंदी होता, शिवलिंग होतें, असें संशोधकांना आढळून आलें आहे. बाविसाव्या जन्मांत हिंदुस्थानांतल्या पवित्र स्थळांचें वर्णन

१ ही माहिती जिनराजदास कृत The Soul's Growth Through Reincarnation या मालेंतील Lives of Orion या पुस्तकांतही पृ.५४-५८ वर दिलेली आहे.

दिलेलें आहे. आर्य लोक हिंदुस्थानांत पहिल्या प्रथम कसे आले, हिंदुस्थानांत त्या वेळीं कोठें कोणाचीं राज्यें होतीं, त्या लोकांशीं आर्यांचे संबंध कशा प्रकारचे होते वगैरे गोष्टी चोविसाव्या जन्मांत दिलेल्या आहेत. सव्विसाव्या व अठ्ठाविसाव्या जन्मांत आर्यांनीं हिंदुस्थानावर नंतर ज्या स्वाऱ्या केल्या त्यांची हकीकत आहे. हें सारें संशोधन वाचल्यास हिंदुस्थानांतले पूर्वींचे अनार्य लोक आर्यां सारखेच सुधारलेले होते, किंबहुना कित्येक बाबतींत त्यांची सुधारणा आर्यांच्यापेक्षां अधिक उच्च होती असें म्हणावें लागतें.

ही गोष्टही अलीकडे सिद्ध झाली आहे. १९२२ च्या सुमारास श्री. रखालदास बानर्जी यांनीं पंजाबमध्यें रावी नदीच्या जवळ हडप्पा येथें आणि सिंध प्रांतांतील लाडखाना जिल्ह्यांत मोहेंजो दडो येथें उत्खनन करून एक जुनी संस्कृति उजेडांत आणली. हिला सिंधु नदीवरील संस्कृति ( Indus Valley Civilization ) असें नांव देण्यांत येतें. या उत्खननांत जी शहरांची आंखणी, जीं घरें, रस्ते, स्नानगृहें, विहिरी, गटारें वगैरे सांपडलीं त्यावरून त्या काळचीं माणसें पुष्कळच सुधारलेलीं होतीं, व त्यांची रहाणी फार चांगल्या दर्जाची होती असें सिद्ध झालें आहे. ही सिंधुनदीवरील संस्कृति व इराक-पर्शियामधील प्राचीन असीरियन-बॅबिलोनियन-सुमेरी संस्कृति यांचे लागेबांधे असल्याचा पुरावाही सांपडला आहे. सिंधच्या पश्चिमेस बलुचिस्थानांत आणि त्याच्या पलीकडे इराणच्या दक्षिण भागांत सर ऑरेल स्टाईन यांनीं ठिकठिकाणीं उत्खनन आणि संशोधन केलेलें आहे. तसेंच इराणच्या पश्चिम भागांत आणि त्याच्या पलीकडे इराकमध्यें ऊर, बॅबिलोन, निनिव्हे, वगैरे पुष्कळ ठिकाणीं सर लिओनार्ड वूले वगैरे अनेक संशोधकांनीं उत्खनन करून संशोधन केलें आहे. या सर्व संशोधनाचा साकल्यानें विचार केल्यास इराक, इराणचा दक्षिण भाग, बलुचिस्तान व सिंध-पंजाब या सर्व ठिकाणीं एका वळणाची संस्कृति असावी किंवा भिन्न संस्कृति असून त्यामध्यें लागेबांधे व साम्य असावें असें संशोधकांनीं ठरविलें आहे. बानर्जींच्या उत्खननांत सिंध–पंजाबमधील

मोहेंजो दडो व हडप्पा येथें ज्या प्रकारचे शिक्के आढळले, त्याच प्रकारचे शिक्के इराणांतील सूसा येथील उत्खननांत अगोदर सांपडलेले होते. तसेंच बानर्जींना सांपडलेल्या भांड्यासारखीं हुबेहूब दिसणारीं भांडीं इराकच्या दक्षिण भागांमधील व इराणमधील संशोधनांत सांपडलीं आहेत. या व असल्या अनेक प्रकारच्या सादृश्यावरून इतिहासज्ञांनीं ठरविलें आहे कीं हिंदुस्थानांत आर्य येण्याच्या अगोदरची ही संस्कृति आहे.

हिंदुस्थानांतील आर्य लोखंडाचा उपयोग करीत. सिंधुनदीवरील संस्कृतींत करवती, विंधणी ( chisels ) वगैरे आहेत. पण ती लोखंडाचीं नसून तांब्यापितळेचीं आहेत. इराकमधीलही या वस्तू तांब्या-पितळेच्या आहेत. तेव्हां हा काल लोखंडाचा समाजांत उपयोग रूढ होण्याच्या अगोदरचा आहे असें संशोधकांनीं ठरवून त्याला ताम्राश्म-युग ( Chalco-lithic period ) असें नांव दिलें आहे. आर्य लोक हिंदुस्थानांत येण्याच्या अगोदरचा हा काळ आहे. आणि त्या काळचे हिंदुस्थानचे अनार्य रहिवासी रामोशी भिल्ल गोंडासारखे मागासलेले नसून चांगले सुधारलेले होते असें आता सिद्ध झालें आहे. यांना 'द्रविड' असें नांव कांहीं इतिहासज्ञांनीं दिलेलें आहे. सर ऑरेल स्टाईन यांनीं यासंबंधानें पुढीलप्रमाणें उद्‌गार काढलेले आहेत.[१] "आतां आम्हांस समजून आलें आहे कीं हिंदुस्थानावर स्वारी करून आर्यांनीं जो हिंदुस्थान देश जिंकला त्या हिंदुस्थानांतील अगोदरची

---

१ सर ऑरेल स्टाईन हे १९३४ सालच्या The Indo–Iranian Borderlands नांवाच्या हक्स्ले व्याख्यानांत म्हणतात :– We now know that the Aryan invaders did not conquer India peopled by premitive barbarians. The indigenous inhabitants whom they dispised and subdued were obviouslta not their equals in virility and physical strength; but probably were their superiors in most things thy make material culture.

लोकवस्ती मागासलेल्या रानटी लोकांची नव्हती. आर्यांना येथील पूर्वीच्या ज्या लोकांबद्दल तुच्छनाबुद्धि वाटत असे व ज्यांच्यावर त्यांनीं स्वामित्व स्थापलें ते अनार्य शरीरसामर्थ्य व शौर्य यांबाबत आर्यांपेक्षा कमी असतील, पण भौतिक सुधारणेच्या बहुतेक गोष्टींत ते आर्यांपेक्षां वरचढ होते.

हिंदुस्थानांत आलेले आर्य लोक प्रारंभीं इंद्र, अग्नि, वरुण या देवांची उपासना करीत. पुढें ब्रह्मा, विष्णु, शिव वगैरेंची उपासना त्यांमध्यें आली. हा फरक कसा झाला? त्याबद्दलचीं पूर्वीचीं मतें टाकून देऊन संशोधक आज असें म्हणू लागले आहेत कीं "आर्य व अनार्य हे लोक शेजारीं शेजारीं राहुं लागल्यामुळें आर्यांच्या अनेक गोष्टी अनार्यांनीं घेतल्या व अनार्यांच्या अनेक गोष्टी आ र्यांनीं घेतल्या व त्यामुळें हें स्थित्यंतर घडून आलें. ते अनार्य सुसंस्कृत असल्यामुळें अशी देवघेव होऊं शकली व तींतूनच नंतरचा हिंदुधर्म अस्तित्वांत आला[१] नंदी, शिवलिंग, त्रिमुर्ति हीं आर्यांच्या अगोदर हिंदुस्थानांत होतीं याचा थिऑसफीय संशोधनांतला उल्लेख वर आलाच आहे.

## झोरोॲस्टरचा काळ

कित्येक व्यक्तींच्या पूर्वजन्माचें संशोधन थिऑसफिकल सोसायटींत मोठ्या प्रमाणावर करण्यांत आलेलें आहे. तें मुख्यत्वेंकरून

---

१. बानर्जी यांनीं Prehistoric Ancient and Hindu India(१९४८) नांवाच्या लिहिलेल्या पुस्तकास डोनाल्ड मॅकेन्झी यांनीं प्रस्तावना (foreword) लिहिली आहे त्यांत ते या मुद्द्याबद्दल म्हणतात.–The modern view, confirmed by the striking Indian discoveries, is that the process was rather one of 'culture mixing' and that the religious changes were due mainly to the fusion of the Aryans and Dravidians and their distinctive cultures, the ancient Dravidians having been a refined and highly civilized people. पृ. IX

मि. लेडबीटर यांनीं केलें आहे. मि. लेडबीटर हें एक विशिष्ट सिद्धीचा उपयोग करून पूर्वकालीन गोष्टींकडे अवधान देत, त्या वेळीं त्यांना त्या गोष्टींचें ज्ञान प्राप्त होई. मग तें अंतर्ज्ञान तोंडानें बोलत व कोणीतरी लेखक त्यांचें बोलणें टिपून घेई. बहुधा अशा रीतीनें हें संशोधन त्यांनीं केलेलें आहे. एकदां असें झालें कीं, ज्या व्यक्तीचा विशिष्ट जन्म त्यांस तपासावयाचा होता ती व्यक्ति इराणांत जन्मलेली होती. पारशी धर्माचा संस्थापक झोरोॲस्टर हा त्या काळीं आपल्या धर्माची संस्थापना करीत होता. आणि, ह्या व्यक्तीचा व झोरोॲस्टरचा त्या वेळीं निकटचा संबंध होता. लेडबीटर यांनीं अंतर्ज्ञानाच्या आधारावर या जन्माची जी माहिती दिली आहे तींत पारशी लोकांच्या धर्मसंस्थापनेविषयीं पुष्कळ हकीकत आलेली आहे.[1]

हें संशोधन पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्याच्या अगोदर प्रथम थिऑसफिस्ट मासिकांत प्रसिद्ध झालें त्या हकीकतीस मि. बी. पी. वाडिया या पारशी गृहस्थांनीं एक खुलाशाचा लेख जोडलेला आहे. झोरोॲस्टरच्या सभोवतीं त्या वेळीं जे इष्टमित्र व सहकारी लोक गोळा झालेले होते त्यांचीं नांवें मि. लेडबीटर यांनीं योगसिद्धीच्या साहयानें जेव्हां ऐकलीं तेव्हां त्यांचे उच्चार त्यांना अत्यंत चमत्कारिक व बिकट असे वाटले. त्यांनीं जसे उच्चार ऐकले तदनुसार त्यांनीं इंग्रजींत स्पेलिंग करून तीं नांवें आपल्या वर्णनांत छापलीं. मि. वाडिया हे त्या वेळीं मि. लेडबीटर यांच्या हाताखालीं मदतनीस म्हणून असत, व संशोधनाच्या वेळीं हजर राहून त्यांस पडेल ती मदत करणें, मि. लेडबीटर यांचें बोलणें टिपणें वगैरे गोष्टी करीत. मि. वाडिया यांनीं उपरोक्त जो खुलाशाचा लेख लिहिलेला आहे त्याचा सारांश पुढीलप्रमाणें आहे:

‘लेडबीटर यांचें अंतर्ज्ञान खरें आहे याबद्दल माझी खात्री झालेली आहे. झोरोॲस्टरच्या धर्मकार्याची जी हकीकत मि. लेडबीटर यांनीं दिली आहे तीवरून ही गोष्ट सिद्ध होते. ह्या हकीकतींत

१ पहा Alcyone's Lives खंड २ जन्म ४६ वा. पृष्ठें ६४८–६५८.

मि. लेडबीटर यांनीं झोरोॲस्टरच्या प्रभावळींत असलेल्या बावीस माणसांचीं नांवें दिलीं आहेत. त्या नांवाचा उच्चार योग-सिद्धीच्या साहाय्यानें ऐकून त्यांनीं त्या नांवाचें तदनुसार पुढील प्रमाणें स्पेलिंग केलेलें आहे. तीं नांवें अशीं :—

1. Arasti 2. Maidhyaimaongh 3. Dugdha 4. Barzinkarus 5. Duransurum 6. Loharaspa 7. Jamaspa 8. Phrashaostra 9. Vishtaspa 10. Hutaosa 11. Isatvastra 12. Puruchista 13. Hvarechithra 14. Urvatatnara 15. Hvoghvi 16. Isfandehar 17. Baman 18. Paishotan 19. Bendva 20. Grehma 21. Phreni 22. Thriti.

'पारशी धर्माची व धर्मस्थापनेच्या काळाची विशेष माहिती नसतांना त्यांनीं हीं नांवें योगसिद्धीच्या साहाय्यानें सांगावी यांतच त्यांच्या योगसिद्धीच्या खरेपणाचें प्रत्यंतर आहे. यांतलीं पुष्कळ नांवें मला माहीत नव्हतीं. हें संशोधन प्रकट झाल्यानंतर मी माझ्या (पारशी) धर्मांतले संशोधनात्मक ग्रंथ पुनः वाचले व त्यांवरून मला दिसून आलें कीं वरील नांवापैकीं कित्येक अगदीं कोनाकोपऱ्यांत असून तीं फारच थोड्या लोकांना अवगत आहेत. त्या धर्म-ग्रंथांत बार्झिंगकारुस (Barzinkarus) हें नांव फक्त एकदांच आलेलें आहे असें मला वाटतें. जमास्पा नांवाचीं दोन माणसें होतीं हेंही फारच थोड्यांना ठाऊक असेल. मला ती गोष्ट माहीत नव्हती. पण धर्मग्रंथांचें पुनः वाचन करतांना डार्मेस्टेटर यांच्या लिखाणांत ती गोष्ट नमूद असलेली मला आढळली. The Sacred Books of The East या मॅक्समुल्लर यांनीं संपादन केलेल्या मालेंत पारशी धर्मग्रंथांचीं इंग्रजीं भाषांतरें झालेलीं आहेत. ते ग्रंथ बारकाईनें पाहिल्यास लेडबीटर यांनीं दिलेलीं नांवें त्यांशीं मिळ-तात. पण उच्चारांत फरक दिसतो. उदाहरणार्थ भाषांतरित ग्रंथांत पोरुषास्प (Porushasp) व पोरुचिस्त (Porukist) हीं जीं नांवें आहेत तीं मि. लेडबीटर यांनीं पुरुषास्प (Purushaspa) व पुरुचिस्त (Puruchista) अशीं दिलीं आहेत, व इस्फेंद्यार (Isfendyar) पेश्योतान (Peshyotan) व बाह्मन (Bahman)

हीं नांवें लेडबीटर यांनीं इस्फान्देहार (Isfandehar) पैशोतान (Paishotan) व बामन (Baman) अशीं दिलीं आहेत. पारशी धर्मग्रंथांतील कांहीं वादग्रस्त मुद्द्यांवर मि. लेडबीटर यांच्या संशोधनाचा उपयुक्त असा प्रकाशही पडत आहे."

मि. वाडिया हे स्वतंत्र विचाराचे गृहस्थ आहेत. पूर्वीं ते थिऑसफिकल सोसायटीचे एक महत्त्वाचे सभासद होते. १९१७ सालीं डॉ. बेझंट यांस होमरूलची राजकीय चळवळ केल्याबद्दल ब्रिटिश सरकारनें जेव्हां अटक केली त्या वेळीं त्यांच्याबरोबर डॉ. जॉर्ज अरंडेल व मि. बी. पी. वाडिया यांनाही सरकारनें अटकेंत ठेविलें होतें, हें आमच्या वाचकांना माहीत असेल. पुढें मि. वाडिया यांचा डॉ. बेझंट वगैरे थिऑसफिकल पुढाऱ्यांशीं कांहीं बाबतींत मतभेद झाला व १९२२ सालीं त्यांनीं थिऑसफिकल सोसायटी सोडली. मि. वाडिया यांचे वर दिलेले विचार १९११ सालचे आहेत. आज त्यांचीं मतें पूर्वींसारखीं असतीलच असें आम्हीं म्हणत नाहीं. पण त्यांच्या लेखांत नामसादृश्याचा जो पडताळा उल्लेखलेला आहे त्यांत बदल होणें शक्य नाहीं. त्या लेखांत दिलेल्या वस्तुस्थितिविषयक सर्व गोष्टी कायम असल्यामुळें मि. वाडिया यांचीं मतें आज जरी पूर्वींसारखीं नसलीं तरी त्यांच्या मतपरिवर्तनामुळें पडताळ्यांत फरक होणार नाहीं हें उघड आहे.

प्रकरण ५ वें

# दोन जागतिक महायुद्धें व नवयुग

गेल्या तीस चाळीस वर्षांतील जगाचा इतिहास जो नजरेखालीं घालील त्याच्या ध्यानांत सहज येईल कीं हल्लींच्यां काळांत कांहीं विशेष आहे, आणि ज्या गोष्टी पूर्वीं अगदीं अनपेक्षित वाटत होत्या त्या सांप्रत सर्व क्षेत्रांत आपल्या डोळ्यासमोर घडू लागल्या आहेत. या अनपेक्षित घटनांच्या काळाला १९१४ च्या पहिल्या जागतिक महायुद्धापासून सुरवात झाली. काळाच्या ओघांत लवकरच मोठा बदल होणार आहे याची कल्पना पहिल्या महायुद्धाच्या पूर्वीं मोठमोठ्या बुद्धिमान् व राजकारणी पुरुषांनाही नव्हती. थिऑसफीय पुढाऱ्यांना ही गोष्ट अंतर्ज्ञानानें पुष्कळच अगोदर समजली होती, व ती त्यांनीं १९०९ सालीं (म्हणजे पहिल्या महायुद्धाच्या पांच वर्षें अगोदर) प्रसिद्धपणें जगासमोर मांडली होती. डॉ. बेझंट यांनीं १९०९ सालच्या मे जून महिन्यांत लंडनमध्यें जीं व्याख्यानें दिलीं[1] तीं काळाचा ओघ लवकरच बदलणार आहे याची जनतेला जाणीव करून देण्यासाठीं बुद्धिपुरस्सर दिलीं. त्यांत त्यांनीं म्हटलें आहे :

---

१ हीं व्याख्यानें The Changing World नांवाच्या पुस्तकांत (१९०९) प्रसिद्ध झालीं आहेत. या आशयाचीं व्याख्यानें डॉ. बेझंट यांनीं नंतर लवकरच जगांतील अनेक देशांत दिलीं. एक महत्त्वाचें व्याख्यान त्यांनीं १९१० च्या थिऑसफिकल सोसायटीच्या कन्व्हेनशनच्या प्रारंभीं अड्यार येथें दिलें. विषयाचें नांव The Opening of a New Cycle (नवयुगाचा उदय) हें होतें. हें व्याख्यान Adyar Pamphlet (क्रमांक १६) मालेंत प्रसिद्ध झालेलें आहे.

सामान्यतः[१] काळाचा ओघ पुष्कळ शतकें अगदीं संथपणानें चालू असतो आणि त्या वेळीं जगाची प्रगति हळू हळू व शांतपणानें होत जाते. मग एकदम तो वळण घेतो, सर्व गोष्टी वायुवेगानें धावूं लागतात, इतिहासाच्या गाड्याला सारखे खटके बसूं लागतात, आणि आपल्या वाडवडिलांनीं एका संबंध शतकांत ज्या गोष्टी पाहिल्या नव्हत्या त्या गोष्टी एका वर्षांत माणसाच्या डोळ्या-समोर नाचूं लागतात. अशा एका संक्रमणकाळाशीं आज जग पुनः येऊन ठेपलें आहे. इतिहासांत असे संक्रमणकाळ पूर्वीं होऊन गेलेले आहेत. आज अशा एका नवीन संक्रमण काळाशीं तुम्ही आम्ही उभे आहों. मी स्वप्नाळू आहें, मला वेड लागलें आहें असें तुम्ही म्हणाल तर म्हणा, पण एक युग संपण्याचीं व नवें युग उजाड-

---

१ पहा The Changing World (१९०९) पृ ३ ते ५ "For many and many a centuty, even for millenia, the slow course of evolution goes on quietly without much of observation and then suddenly comes a change, . . . a transition age in which all movement is rapid, in which cotastrophies, are frequent, in which sudden changes make themselves felt, in which men grow in a year more than their fore-fathers grew perhaps in a century. In such a transition age, again the world is standing at the present time. . . . . . It is not of course for the first time that such a period as this has come upon the world. . . . . It is in tht next transition stage that you and I are standing; and although many of you may say, as they would have said of old, that I am a dreamer, or am mad, none the less will I strive to tell you, this evening and the Sundays that follow, something of the signs by which you may judge for youselves. For many are the signs of the age that is closing and many the signs also of the day that is dawning upon the earth."

ण्याचीं पुष्कळ चिन्हें माझ्या नजरेला जगांत सर्वत्र दिसत आहेत. आणि माझ्या या व्याख्यानमालेंत त्या खुणा आपणाला सविस्तर दाखवून द्याव्या असा माझा हेतु आहे.

## नवयुगाचा उदयकाळ

इ. स. १९०९ सालीं डॉ. बेझंट यांनीं हीं व्याख्यानें दिलीं. इतिहासाचा ओघ लवकरच नवीन वळण घेणार आहे[1] याची कल्पना बुद्धिमान् लोकांच्या जडवादी दृष्टीला पटण्यासारखी नसल्यामुळें जनतेला हीं व्याख्यानें त्या वेळीं हास्यास्पद व विचित्र वाटलीं. पण आज डॉ. बेझंट यांचें म्हणणें आपल्या डोळ्यासमोर

---

१ नाहीं म्हणायला एच. जी. वेल्ससारखा एकादा प्रतिभावान् लेखक ही गोष्ट आपल्या लेखांत मांडीत असे. पण व्यावहारिक दृष्टीचीं माणसें असल्या लिखाणाला 'कादंबरी' असें म्हणत. या लेखकांचे विचारही अंतर्ज्ञानावर आधारलेले नव्हते. कधीं कधीं ते अंतर्ज्ञानाची थट्टाही करीत. हे विचार पुढें खरे झाले नसते तर ही सर्व आमची कविकल्पना होती असें म्हणून त्यांतून पळवाट काढण्याला या लेखकांना जागा होती. श्री. अरविंदाच्या लिखाणांत मात्र ही गोष्ट नमूद आहे. ते अंतर्ज्ञानी असल्यामुळें त्यांच्या विचाराचें प्रत्यंतर आल्याबद्दल त्यांनाही श्रेय देणें वाजवी आहे. अरविंदांचें अंतर्ज्ञान व थिऑसफीचें अंतर्ज्ञान यांचा परस्परांस दुजोरा मिळाल्यामुळें अंतर्ज्ञानाच्या सत्यतेचा त्यांत पुरावा आहे. पण अरविंदांचे विचार नंतरचे आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. थिऑसफीय पुढाऱ्यांनीं हे विचार १९०९ सालीं जरी प्रसिद्धपणें मांडले असले तरी तें अंतर्ज्ञान त्यांस १९०१ सालीं झालें होतें असें जिनराजदासकृत The War and After या पुस्तकांतील पृष्ठ १४ वरून उघड होतें. श्री. अरविंद १९१० सालीं पांडिचेरीस गेले व त्यानंतर पुष्कळ वर्षांनीं त्यांच्या म्हणण्यांत हा भाग येऊं लागला. थिऑसफीस नाक मुरडणारे जे लोक आहेत त्यांना थिऑसफीय पुढाऱ्यांनीं ही गोष्ट अरविंदापासून घेतली असें म्हणण्यास बिलकूल वाव नाहीं हें वाचकांनीं विसरू नये.

खरें होत आहे, आणि नानाक्षेत्रांतील पुराणमताभिमानी लोकांनाही जुनें युग मावळून जग नवीन युगांत शिरत आहे याची जाणीव आज येत असलेली दिसत आहे!!

ही गोष्ट जगासमोर मांडण्यांत डॉ. बेझंट यांचा एक विशेष उद्देश होता. काळाचा ओघ बदलल्यावर जगांतील नाना क्षेत्रांत नवे विचार येतील, नव्या घटना घडूं लागतील, जुन्या परंपरा मोडतील, त्या वेळीं जनतेनें गोंधळून जाऊं नये, जुनें मोडूं द्यावें व नवविचारांचें स्वागत करावें, आणि अशा रीतीनें नवीन युगांतील जगाची नवी घडी बसविण्यास अनुकूल वातावरण उत्पन्न करावें यासाठीं हा मुद्दा त्यांनीं जनतेसमोर मांडला होता. माणूस स्वभावतःच पुराणप्रिय असतो. जुनें जीवन व जुने विचार सोडून नवीन गोष्टींचा स्वीकार करावयास तो नाखूष असतो. तेव्हां पुढें जग कोणत्या वळणावर जाणार आहे याचा त्याला अगोदर इशारा देऊन त्याला जागृत करणें हें डॉ. बेझंट यांना अवश्य वाटलें. राजकीय व लष्करी आक्रमण हें चूक आहे, सर्व देशांना स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, लढाया बंद केल्या पाहिजेत, त्या बंद केल्या तरच जगांत सर्वत्र आर्थिक सुबत्ता निर्माण करतां येईल, दारिद्र्य कोठेंही असतां कामा नये, सर्व देशांनीं आपापलीं अर्थशास्त्रविषयक धोरणें आखतांना इतर देशांशीं सहकार्य केलें पाहिजे, मानवतेच्या क्षेत्रांत स्पृश्य-अस्पृश्य, काळा-गोरा हे भेद नसावेत, धर्मांधर्मांतील वैमनस्यें नष्ट केलीं पाहिजेत, माणसाचा देशाभिमान व धर्माभिमान यांना योग्य मर्यादा घातल्या पाहिजेत, जागतिक संघटना करून जगांतील राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, धार्मिक, आरोग्यविषयक प्रश्न सोडविण्याकरितां जगांतील सर्व पुढाऱ्यांनीं एकत्र जमून सहकार्य केल्याशिवाय ते प्रश्न सुटणार नाहींत, असे कितीतरी नवविचार आज जगांत येत आहेत. त्यांना शहाण्यासुर्त्यांनींही पुष्कळ विरोध केलेला आपण पहातों. तो विरोध कमी करण्यासाठीं डॉ. बेझंट यांनीं हीं व्याख्यानें दिलीं होतीं.

नव्या युगाचा उंबरठा जनता ओलांडूं लागण्याच्या वेळीं जगांत दोन महायुद्धें उत्पन्न झालीं. त्या युद्धांची परिणति पुढें काय होईल तें अगोदरच थिऑसफिकल सोसायटींत जाहीर रीतीनें सांगण्यांत आलेलें होतें; व त्याप्रमाणेंच त्या दोन्ही युद्धांची परिणति यथाकाल झाली. आनंदाची गोष्ट अशी कीं ती परिणति नवयुगाच्या आकांक्षांस पोषक अशीच झाली. त्या युद्धांचा विचार आपण येथें करूं या.

## पहिलें जागतिक महायुद्ध

चालू शतकांतील पहिलें जागतिक महायुद्ध सन १९१४ सालीं सुरू होऊन १९१८ सालीं संपलें. तें जें संपलें तें एकाएकीं अनपेक्षित रीतीनें जर्मनीचा राजा विल्यम कैसर राज्यत्याग करून पळून गेला म्हणून संपलें. जर्मनी, व इंग्लंड-फ्रान्स-अमेरिका यांचीं परस्परविरोधी सैन्यें चर खणून त्यांत बसलीं होतीं, कोणत्याही सैन्याला पुढें जातां येत नव्हतें किंवा आपल्या शत्रूला मागें हटवितांही येत नव्हतें, आणि युद्धाचा डाव कुजल्यासारखा झाला होता. अशा स्थितीत हें युद्ध एकदम संपेल अशी कल्पना मोठमोठ्या (इंग्रज) मुत्सद्द्यांनाही आली नसतांना तें एकदम १९१८ च्या नवंबरांत संपुष्टांत आलें. या युद्धांत कोण जिंकणार व कोण हरणार याबद्दल डॉ. बेझंट यांनीं अंतर्ज्ञानाच्या जोरावर सार्वजनिक रीत्या केलेलीं विधानें पहाण्यासारखीं आहेत. डॉ. बेझंट ह्या १९१७ सालच्या डिसेंबरांत कलकत्ता येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष होत्या. आपल्या अध्यक्षीय भाषणांत त्या म्हणाल्या, मुत्सद्दी या नात्यानें न बोलतां क्षणभर अध्यात्मशास्त्राची अभ्यासू म्हणून मी सांगतें कीं या महायुद्धाचा शेवट निश्चित आहे आणि जर्मनी हा युद्धांत नामोहरम होणार आहे.[१]

---

१ 'To me, speaking for a moment not as a politician, but as a student of spiritual laws, to me the end of the war is sure.' या वाक्यानंतर त्यांनीं जर्मनीचा पराभव होणार असें म्हटलें आहे.

या अध्यक्षीय भाषणच्या सुमारे दोन वर्षें अगोदर मुंबई येथें थिऑसफिकल सोसायटीची वार्षिक कन्व्हेन्शन डॉ. बेझंट यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. या कन्व्हेनशनच्या अहवालांत (General Report of the Fortieth Anniversary and Convention of the The Theosophical Society held at Bombay, Dec. 25-29, 1915) डॉ. बेझंट याचें अध्यक्षीय भाषण आहे. त्यांत पृ. ३ ते ६ वर ह्या जागतिक महायुद्धाविषयीं अंतर्ज्ञानमूलक महिती त्यांनीं दिली आहे. त्यांत डॉ. बेझंट म्हणतात कीं असलीं महायुद्धें इतर सामान्य युद्धांसारखीं नसतात.[१] मानवी उत्क्रान्ति सरळ पुढें चालत जावी कीं तिला पायबंद घातला जावा असा तत्त्वाचा प्रश्न असल्या महायुद्धांत अनुस्यूत असतो. युध्यमान पक्षांपैकीं एक पक्ष उत्क्रांतीला पोषक असतो व दुसरा घातक असतो. हीं युद्धें अदृश्य भूमिकेवर आणि दृश्य भूमिकेवर अशा दोन्ही भूमिकांवर चालू असतात. असल्या युद्धांत दृश्य रीतीनें मोठालीं सैन्यें पृथ्वीवर हिरिरीनें लढत असतात, आणि माणसांस न दिसणाऱ्या भूमिकेवर अतिमानवही लढत असतात. असल्या

१. "The men fight desperately, visible on the earth; the Supermen fight in the world invisible to mortal eyes. There is ever war in Heaven as well as on the earth, in these struggles that decide the fate of the world for thousands of years. We call the Supermen who fight for victory of the Divine will in evolution and are themselves the embodiments of a portion of that will,--the Occult Hierarchy, the Guardians of our world. And we call the supermen who fight against it, who would preserve the old worn-out ways that have become poisonous, the Dark Forces; in the poetical eastern nomenclature, the Lords of the Dark Face. Both sides work through men, and through men their triumphs and defeats are wrought out, the shadow here on earth of the events above.

संग्रामांत सदा जमीन व अस्मान या दोन्ही ठिकाणीं झुंज होऊन हजारो वर्षांचें माणसांचें भवितव्य ठरविलें जातें. उत्क्रांति-मार्गावरल्या ईश्वरी संकल्पाचे अंशभूत होऊन जे संस्कृतिसंरक्षक अतिमानव त्या संकल्पाला यश मिळावें म्हणून लढत असतात त्यांना आम्ही 'सिद्धसंघ' असें नांव देतों आणि जे अतिमानव भावी उत्क्रांतीला विषासारखे घातक होणारे मार्ग चालू ठेवण्यासाठीं त्यांच्या विरुद्ध लढतात त्यांना 'वाममार्गी' व 'अघोरपंथी' अशीं विशेषणें आम्ही लावतों. हे दोन्ही पक्ष माणसांना हातीं धरून त्यांच्या द्वारानें आपले उद्योग चालवितात आणि वरच्या भूमिकेवर मिळालेले जे जय व अपजय त्यांचीं प्रतिबिंबें पृथ्वीवर पडून तदनुसार पृथ्वीवरील युद्धांत माणसांच्या वाट्यास जय व अपजय येत असतात.

## युद्धाची अदृश्य बाजू

हिंदुधर्मांतही हीच युद्धमीमांसा सांगितलेली आहे. समर्थ रामदासांचें आनंदवनभुवन प्रकरण पाहिल्यास त्यांत अदृश्यभूमिकेवर चालू असलेल्या युद्धाची हकीकत आढळेल.[१] उदाहरणार्थ रामदासांनीं 'खवळले लोक देवांचे । मुख्य देवचि ऊठला ॥ मोहीम मांडली मोठी । आनंदवनभूवनीं ॥ रामवरदायिनी माता । गर्द घेऊनि ऊठिली ॥' वगैरे शब्दांनीं त्या युद्धाचें वर्णन केलेलें आहे.

महाभारतांत कर्ण व अर्जुन यांच्या युद्धाची हकीकत असून त्यांतही हाच प्रकार वर्णिलेला आहे (कर्ण पर्वांतील कर्णार्जुन-समागम नांवाचा ८७ वा अध्याय पहा) त्यांत त्या दोघांच्या युद्धाच्या अगोदर अदृश्य भूमिकेवर कर्णाचा पिता सूर्य व इंद्र हे आलेले आहेत व त्यांच्यामध्यें भांडण चाललें आहे असें वर्णन आहे. इंद्रानें त्या भांडणांत अर्जुनाची बाजू धरलेली होती व सूर्यानें

---

१ प्रस्तुत पुस्तकाच्या लेखकांपैकीं श्री. भागवत यांनीं लिहिलेल्या 'महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार' या पुस्तकांत शेवटीं वरील समर्थकृत प्रकरण दिलें असून त्याचा तेथें त्यांनीं अधिक खुलासा केला आहे, तो वाचकांनीं पहावा.

कर्णाची धरलेली होती व आपापल्या बाजूस जय मिळावा यासाठीं ते दोघे झटत होते. देव, दानव, गंधर्व, पिशाच्च, उरग, राक्षस यांनीं तेथें येऊन कर्णार्जुनांच्या युद्धांत आपापसांत एकमेकांशीं विरुद्ध असे पक्ष अंगीकारले होते.[1] तेथें गिरि, सागर, नद्या वगैरें-च्या देवताही आलेल्या होत्या. त्या भूमिकेवर अदृश्य सृष्टींतील कोणकोण व्यक्ति उपस्थित होत्या व त्यांनीं कोणकोणाचा पक्ष घेतलेला होता त्याचें विस्तृत वर्णन महाभारतांतील या अध्यायांत दिलेलें आहे. त्या वेळीं ब्रह्मदेवही तेथें आलेला होता. या युद्धांत कोण विजयी होईल हा प्रश्न त्याला विचारण्यांत आला. कर्णानें अन्यायाची बाजू धरल्यामुळें त्याचा पराभव करणें अवश्य आहे व तसेंच होईल असें ब्रह्मदेवानें तेथें उत्तर दिलेलें आहे.[2]

मोरोपंतांनींही आपल्या आर्याभारतांत हेंच सांगितलेलें आहे.[3] ते म्हणतात 'सुर-सिद्ध-साध्य-विद्याधर मुनिगंधर्व होति जिष्णुकडे। अभिमान अधिरथिचा, शुक्र-दनुज-दितिज-राक्षसांसि पडे ॥ म्हणजे अदृश्यभूमिकेवरचे देव, सिद्ध, साध्य, विद्याधर, मुनि, गंधर्व यांनीं अर्जुनाची बाजू धरली होती व शुक्र, दनुज (दानव) दितिज (दैत्य) राक्षस यांनी अधिरथि कर्णाचा अभिमान धरलेला होता. ब्रह्मदेवानें जं उत्तर दिलें तें मोरोपंतांनी पुढील आर्येत सांगितलें आहे. 'कर्णहि समर्थ, परि हा दानव-पक्षी असे खणोनि न या। जय कैंचा, मरण रणी पावेल, अधोगती म्हणोनि न या ॥' म्हणजे कर्ण हा जरी समर्थ योद्धा असला तरी त्यानें दानवांचा पक्ष स्वीकारलेला आहे. त्यानें न्यायनीति खणून टाकलेली आहे. त्याला जय कसा मिळणार? तो रणागंणावर मरून जाईल. पण रणांगणा-वर मृत्यु आल्यामुळें तो मरणोत्तर अधोगतीस मात्र जाणार नाहीं.

---

१ देवदानवगंधर्वाः पिशाचोरगराक्षसाः।
प्रतिपक्षग्रहं चक्रुः कर्णार्जुनसमागमे ॥
(महाभारत कर्णपर्व कर्णार्जुन समागम अ. ८७–श्लो. ३७,३८)

२ कर्णश्च दानवपक्षः अतः कार्यः पराजयः। कर्णपर्व अ. ८७–श्लो. ७०

३ पहा मोरोपंतांचें आर्याभारत कर्णपर्व अध्याय ४६

दृश्य सृष्टींतील युद्धांत आपापल्या पक्षाला जय मिळावा यासाठीं अदृश्य सृष्टींतील सुर व असुर अगोदर कशा कारवाया करीत असत तेंही महाभारतांत वर्णन करून सांगितलें आहे. एका प्रसंगीं दुर्योधनाला अत्यंत अपमान वाटल्यामुळें त्यानें उपास करून आत्महत्या करण्याचा निश्चय केला होता. जर दुर्योधनाचा अशा रीतीनें अंत झाला तर पृथ्वीवरील आपल्या पक्षाचा एक शूर योद्धा कमी होऊन आपला बाजू लंगडी होईल, यासाठीं त्या वेळीं असुरांनीं दुर्योधनाचें मन वळवून उपासापासून त्याला परावृत्त केलें असें महाभारतांत लिहिलेलें आहे.[१]

ह्या पहिल्या जागतिक महायुद्धाचा निकाल काय होणार ह्याची निश्चित कल्पना त्या वेळीं कोणालाही करतां येण्याजोगी नव्हती. प्रथम फ्रान्स व इंग्लड एका बाजूस, व जर्मनी उलट बाजूस असें युद्ध चाललें होतें, व जर्मनीनें मुसंडी मारून बेल्जमवर हल्ला करून तो देश पादाक्रांत केला आणि फ्रान्समध्येंसैन्य घुसवून फ्रेंच सेनेला पॅरिस-कडे रेटीत नेलें. त्यावेळीं इंग्लड व फ्रान्स या दोस्तांच्या सैन्याचा अंतीं पराभव होईल अशीच लोकांची अटकळ होती. पण जर्मनीनें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांना खिजविण्याचें धोरण अंगीकारलें व त्याचा परिणाम होऊन अमेरिका १९१७ च्या एप्रिलांत दोस्तांच्या बाजूनें युद्धांत पडली. त्या नंतर दोस्त जिंकतील असें जनतेस वाटण्याचा थोडा फार संभव उत्पन्न झालेला होता. पण अमेरिका युद्धांत येण्याच्या एक वर्ष अगोदर डॉ. बेझंट यांनीं पुढील विधान जाहीर रीत्या केलेलें आढळतें:-[२] 'अदृश्य भूमिकेवर जर्मनीची बाजू

---

१ वनपर्व, अध्याय २५२ पहा; मोरोपतांनीं ही हकीकत वनपर्व अध्याय ७ आर्या ७९–८३ यांत दिली आहे.

२ पहा एप्रिल १९१६ चा थिऑसफिस्ट मासिकाचा अंक पृ १. त्यांत पुढील वाक्य आहे: 'We know that in the higher worlds the battle is won, that the forces of evil are driven back and that their strength is broken.'

यापूर्वीच नेस्तनाबूद झाली असून तिला माघार घ्यावी लागली आहे, आणि दोस्त राष्ट्रें युद्धांत विजयी झालीं आहेत ह्या गोष्टीचें मला ज्ञान झालें आहे; म्हणजे यापूर्वींच सूक्ष्मभूमिकेवर या युद्धाचा निकाल लागलेला आहे, व सूक्ष्मभूमिकेवरील घटना कांहीं काळानें दृश्य जगांत नियमानें प्रकट स्वरूप धारण करीत असल्यामुळें दृश्य भूमिकेवरही जर्मनी नक्की पराभूत होईल असा त्यांच्या म्हणण्याच्या अभिप्राय आहे. जेव्हा डॉ. बेझंट ह्या या गोष्टी अंतर्ज्ञानाच्या जोरावर लोकांस सांगत होत्या त्या वेळीं त्या त्यांस बिलकुल पटल्या नाहींत. एक तर जर्मनीच्या पराक्रमानें पुष्कळांचे डोळे दिपून गेलेले होते व जर्मनी दोस्तांवर आक्रमण करीत पुढें पुढें चालला होता; आणि डॉ. बेझंट या जातीनें इंग्रज असल्यामुळें त्यां जात्यभिमानास्तव इंग्रज जिंकतील असें म्हणत आहेत व त्यासाठीं अंतर्ज्ञानाचें निमित्त सांगत आहेत अशी जनतेनें आपली समजूत करून घेतली होती. पण हें त्यांचें अंतर्ज्ञान खरें असल्याचा प्रत्यय सर्व जगतास लवकरच म्हणजे १९१८ सालच्या अखेरीस आला.[1]

## दुसरें जागतिक महायुद्ध

दुसरें जागतिक महायुद्धही[2] ह्याच प्रकारचें होतें. तत्संबंधीं अंतर्ज्ञानानें अगोदर सांगितलेल्या गोष्टीही नंतर तंतोतंत खऱ्या ठरल्या

---

१ थिऑसफिस्ट मासिकाच्या सप्टेंबर १९४७ च्या अंकांत प्रारंभीं Watch Tower या सदराखालीं जो मजकूर आहे त्यावरून दिसून येतें कीं, याबाबतचेंही अंतर्ज्ञान डॉ. बेझंट यांस त्यांच्या वरिष्ठांकडून १९१५ सालीं प्राप्त झालेलें होतें. जिनराजदास कृत Occult Investigations पृ. ५१–५३ हेंही पहा.

२ हें युद्ध इतर युद्धांसारखें.दोन देशांतील लौकिक भांडणासारखें नसून त्यांतील एक पक्ष अखिल मानवजातीच्या उत्क्रान्तीला पोषक आहे व दुसरा घातक आहे असें थिऑसफीय पुढाऱ्यांचें म्हणणें होतें. हें म्हणणें राजकीय दृष्टीनें केलेलें नसून आध्यात्मिक अनुभवावर आधारलेलें होतें. थिऑसफि-

(टीप पुढील पानावर चालू)

आहेत. तें युद्ध १९३९ सालीं सप्टेंबरच्या प्रारंभीं सुरू झालें. त्या वेळीं डॉ. ॲरंडेल हे थिऑसफिकल सोसायटीचे अध्यक्ष होते. त्यांना अंतर्ज्ञान असे. Conscience नांवाचें एक इंग्रजी साप्ताहिक ते चालवीत. त्या साप्ताहिकाच्या ३१–८–३९ च्या अंकांत त्यांनीं The Oracle Speaks (ईश्वराचा कौल) नांवाचा एक लेख लिहिला व १५–९–३९ च्या अंकांत The Oracle Continues ('ईश्वराचा कौल–पुढें चालू') नांवाचा दुसरा लेख लिहिला. दोन्ही लेखांत युद्धाची परिणति काय होणार तें त्यांनीं दिलेलें आहे.

दुसऱ्या लेखावर 'ऑगस्टच्या १८ तारखेस लिहिलेला' असे शब्द आहेत. असें दिसतें कीं महायुद्ध प्रत्यक्ष सुरू होण्याच्या अगोदर पण युद्ध सुरू होईल असें वातावरण सर्वत्र पसरलेलें असतांना म्हणजे १८–८–३९ ला डॉ. अरंडेल यांनीं एक मोठा लेख लिहून, त्याचे दोन भाग पाडले. पहिला भाग ३१–८–३९ च्या अंकांत

---

(टीप मागील पानावरून)

कल सोसायटीशीं संबंध नसलेल्या लोकांपैकीं फक्त योगी अरविंद हे एकटेच पुरुष होऊन गेले कीं ज्यांनीं अध्यात्म दृष्टया या महायुद्धाचें हेंच निदान केलेलें होतें. पहा श्री. अरविंदांचीं On the War नांवाचीं पत्रें पृ. ४ व ५. श्री. अरविंदांचें अंतर्ज्ञान व थिऑसफीय पुढाऱ्यांचें अंतर्ज्ञान ह्या दोन्ही गोष्टी स्वतंत्रपणें संपादित केलेल्या असूनही त्या दोघांचें निदान एकच होतें. यावरून या दोघांचें अंतर्ज्ञान खरें आहे असें ओघानेंच ठरतें. हिंदुस्थानांतील जनतेस व राष्ट्रीय सभेस हें निदान मान्य नव्हतें. राष्ट्रीय सभेनें आपलें राजकीय धोरण बदलून त्या निदानाला पोषक असें धोरण स्वीकारावें अशी श्री. अरविंदांची इच्छा होती, व सर स्टॅफर्ड क्रिप्स हे हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभेशीं बोलणीं करण्यास आले असतांना श्री. अरविंदांनीं मुद्दाम आपले हस्तक पाठवून राष्ट्रीय सभेनें आपलें धोरण बदलावें अशी देशाच्या पुढाऱ्यांना विनंति केली होती. (पहा शिशिरकुमार मित्र कृत The Liberator Shri Aurobindo नांवाचें अरविंदांचें चरित्र पृ. १७८–१८२)

The Oracle Speaks या मथळ्याखालीं आणि दुसरा भाग १५-९-३९ च्या अंकांत The Oracle Continues या मथळ्याखालीं त्यांनीं प्रसिद्ध केला. पहिला भाग छापण्यांत आला तेव्हां युद्धास सुरवात झालेली नव्हती. दुसऱ्याच दिवशीं म्हणजे सप्टेंबरच्या पहिल्या तारखेस युद्धाचा वणवा पेटला आणि तो पेटल्यावर पंधरा दिवसांनीं दुसरा भाग प्रसिद्ध झाला. हे दोन्ही लेख वाचले म्हणजे ते अंतर्ज्ञानावर आधारलेले आहेत हें उघड दिसतें. हे दोन्ही लेख समग्र वाचण्यासारखे आहेत; पण स्थळाभावास्तव त्यांतील विधानें संक्षिप्त रूपानें आम्हांस येथें द्यावीं लागत आहेत.

पहिल्या लेखांत डॉ. ॲरंडेल म्हणतात कीं युद्ध झाल्यास इंग्लंडच्या पक्षास जय मिळेल. गर्विष्ठपणा सोडून इंग्लंडला नव्या मार्गानें व अंधकाराच्या बोगद्यांतून पुढें जाणें अवश्य होईल; पण तो बोगदा संपल्यावर इंग्लंड उजेडांत येईल. स्वतःच्या दुष्कर्मांच्या भारामुळें जे देश कोलमडून पडावयाचे आहेत त्यांत प्रथम इटली येईल. जर्मनीलाही पुनश्च पराभवाचें दुःख भोगणें प्राप्त होईल. जपानचें मरण चिनांत आहे. चीनवर केलेल्या अन्यायाचा परिणाम म्हणून जपान मृत्युपंथास लागेल आणि कांही काल तो देश जरी वरवर पहातां सामर्थ्यवान् दिसला तरी त्याची सद्दी संपली आहे.[1] दुसऱ्या

---

१. पहिल्या लेखांतील मजकूर सारांशरूपानें पण होतां होईल तों मूळच्या शब्दांत पुढीलप्रमाणें आहे :-

Should there be war, Britain will be amongst the winning powers. She will have to proceed along her new way with humbled pride. She must pass through a tunnel of darkness, but there will be light at the other end. One of the first countries to break under the strain of its misdeeds will be fair Italy.... Germany must also know defeat once more........Japan will find her grave in China. Her wrong to China is the beginning of her dying; and although she may linger in apparent strength, her day is done.

लेखांत डॉ. अॅरंडेल यांनीं लिहिलें आहे कीं फ्रान्स देशाची गणना विजयी राष्ट्रांत व्हावयाची आहे.[१]

या साप्ताहिकाच्या १५।९।३९ च्या अंकांत डॉ. अॅरंडेल यांनीं War या नांवानें आणखी एक लेख लिहिला आहे. त्यांत लढाईचा निकाल अगदीं निश्चित आहे असें विधान त्यांनीं केलें आहे.[२] कांहीं महिने युद्ध चालल्यावर १९४० च्या मे महिन्यांत फ्रान्स देशाचा पाडाव होऊन तो जर्मनीच्या ताब्यांत गेला व लवकरच जर्मनी इंग्लंडलाही दांतीं तृण धरावयास लावील अशी भीति सर्वांस वाटूं लागली. त्या वेळीं २७–६–४० च्या अंकांत 'ब्रिटन पडणें शक्य नाहीं' या नांवाचा त्यांनीं आणखी एक लेख लिहिला असून 'इंग्लंड पादाक्रांत होणें शक्य नाहीं हें ब्रह्मलिखित आहे अशा जोरदार शब्दांनीं त्या लेखाचा समारोप केला आहे.[३]

ही अंतर्ज्ञानावर आधारलेली माहिती पुढें तंतोतंत खरी झाली. पहिला लेख जेव्हां छापण्यांत आला तेव्हां महायुद्धाला सुरवात झाली नव्हती. महायुद्धांत प्रारंभीं जपान व इटली हे देश आलेले नव्हते. इटली १९४० च्या जूनमध्यें युद्धांत पडला व जपान १९४१ च्या डिसें-बरांत युद्धांत सामील झाला. ते देश युद्धांत येण्याच्या अगोदर इटली व जपान यांचें काय व्हावयाचें आहे तें या लेखांत नमूद झालेलें आहे. कोलमडून पडणाऱ्या देशांत प्रथम इटलीची गणना होईल हें जें या लेखांत लिहिलेलें आहे त्याप्रमाणें प्रत्यक्ष घडून आलें आणि इट-लीचा प्रथम पाडाव होऊन दोस्तांचें सैन्य सिसिली-इटली मार्गानें जर्मनींत घुसलें हें आमच्या वाचकांस आठवत असेलच. हिटलरनें फ्रान्स गिळंकृत केल्यावर इंग्लंडही त्याच्या भक्ष्यस्थानीं पडणार असें सर्वांस वाटत होतें; पण तसें होणार नाहीं असें डॉ. अॅरंडेल

---

१. "France will be amongst those who win."

२ The actual result of the war is certain.

३ **Britain Shall not Fall** हा लेखाचा मथळा आहे व **But it is written that she shall not fall.** हे शेवटले शब्द आहेत.

यांनीं त्या धामधुमीच्या काळांत सार्वजनिक रीत्या निक्षून सांगितलें व तेंही खरें ठरलें. असा कितीतरी तपशील खरा झालेला आहे!

हें थिऑसफीय अंतर्ज्ञान त्या वेळीं लोकांस अत्यंत हास्यास्पद वाटलें. थिऑसफिकल सोसायटीचे दुसरे एक पुढारी सी. जिनराजदास हे होते. त्यांनीं १९३९ च्या डिसेंबरांत अड्यार येथें The War and After नांवाचें एक व्याख्यान देऊन त्यांत या युद्धाविषयींचा थिऑसफीय दृष्टिकोण श्रोत्यांसमोर मांडला. तो महाराष्ट्रीय जनतेसमोरही यावा म्हणून वरील व्याख्यानाचा सारांश काढून आम्ही तो त्या वेळीं महाराष्ट्रांतील एका अत्यंत वजनदार व सुप्रसिद्ध वर्तमानपत्राकडे–केसरीकडे–प्रसिद्धीकरतां पाठवून दिला. संपादक ज. स. करंदीकर यांनीं तो छापला तर नाहींच; पण उलट थिऑसफीच्या उपहासानें भरलेलें एक तुच्छतापूर्ण पत्र आम्हांस बहाल केलें. तें पत्र जो वाचील त्याला समजून येईल कीं त्या वेळीं बुद्धिमान् माणसांचेही डोळे हिटलर-मुसोलिनींच्या तेजानें दिपून जवळजवळ अंधळे झालेले होते आणि युद्धाविषयींची थिऑसफीय विचारसरणी आणि भविष्य याविषयीं त्यांच्या मनांत सर्वस्वीं तिरस्काराची भावना वसत होती. पण त्या वेळीं बुद्धिमान् व हुशार माणसांस हास्यास्पद व अशक्यप्राय वाटणारें हें अंतर्ज्ञानावर आधारलेलें भविष्य पुढें संपूर्णपणें खरें ठरलें ! ! [1]

## इंग्लंड-अमेरिका यांची राजकीय संघटना

मि. लेडबीटर हे एक थिऑसफिकल सोसायटीचे पुढारी होऊन गेले. त्यांना अंतर्ज्ञान असे. सी. जिनराजदास यांचा मि. लेडबीटर

१ केसरी पत्राचे संपादक श्री. ज. स. करंदीकर यांनीं आमचा लेख छापण्याचें नाकारून आम्हांस जें पत्र लिहिलें तें समग्र पुढें देत आहोंत. त्यावरून थिऑसफीय भविष्य त्यावेळीं लोकांस किती वेडगळपणाचें वाटत होतें त्याची कल्पना आमच्या वाचकांस येईल आणि थिऑसफीय पुढाऱ्यांनीं अजमासानें कांहीं तरी भविष्य वर्तविलें व तें काकतालीय न्यायानें पुढें खरें झालें असें म्हणावयास जागा नाहीं हें आमच्या वाचकांस कळून चुकेल

(टीप पुढील पानावर चालू)

यांशीं घनिष्ठ स्नेहसंबंध होता. मि. लेडबीटर हे अंतर्ज्ञानाच्या अनेक गोष्टी श्री. जिनराजदास यांशीं बोलत व श्री. जिनराजदास त्यांची टिपणें करीत. २१ डिसेंबर १९०६ रोजीं मि. लेडबीटर यांनीं त्यांना ज्या गोष्टी सांगितल्या त्यांचें त्यांनीं त्या वेळीं टिपण केलेलें

---

(टीप मागील पानावरून)

संपादक महाशय लिहितात--

केसरी आणि मराठा कचेरी
५६८ नारायण पेठ, पुणें.

श्री समर्थ ता. ९।३।१९४०

"सा. न. वि. वि. आपलें पत्र पोचलें. त्यानंतर आपला लेख आला तोही वाचून पाहिला. तो लेख केसरींत देतां येण्याजोगा नाहीं म्हणून तो परत पाठविण्यास सांगितला आहे. तो परत पाठविण्याचें कारण असें कीं त्या लेखांतली आमूलाग्र विचारसरणी मला अमान्य आहे. एकाद्या मुद्द्यावर मतभेद असता तर तेवढी टीप जोडली असती. अथवा वाद्‌विवाद होऊन लोकांना ज्ञानबोध व्हावा म्हणून लेख प्रसिद्ध करून वादाला तोंड पाडून दिलें असतें. पण आपल्या लेखांतील इंग्रज राष्ट्राविषयींची कल्पना, इंग्रज हिंदुस्थानांत कां आले यांविषयींची कल्पना, जीवन्मुक्तांनीं आर्य चाणक्यालाही खालीं पहावयास लावावें' अशा तऱ्हेच्या चालविलेल्या उलाढाली, त्या जीवन्मुक्तांच्या सदिच्छेला विरोध करणाऱ्यांची प्रबल शक्ति व त्या मानानें जीवन्मुक्तांचा व तत्पक्षीयांचा दुबळेपणा, हिटलेर व स्टॅलिन यांसंबंधाचें आपलें मत आणि युद्धें कां उत्पन्न होतात व कोणतें कार्य साधेपर्यंत चालू रहातात याची कल्पना इत्यादि सर्व विचारसरणी वाचली म्हणजे त्याच्यापुढें भोळ्या भाबड्या हिंदी लोकांनीं केलेली इंग्रजी राज्यासंबंधाची (रामानें माकडांना वर दिल्यामुळें इंग्रज राज्य करीत आहेत) कल्पनाही कमी हास्यास्पद वाटते. असल्या विक्षिप्त कल्पना तुमच्या तर्कपद्धतींत बसतात तरी कशा याचेंच सखेदाश्चर्य वाटतें. पण तो तुमच्या भावनेचा प्रश्न आहे. मात्र केसरीच्या वाचकांनीं इतका भोळसटपणा स्वीकारूं नये अशी माझी प्रामाणिक इच्छा आहे. राग नसावा, लोभ असावा ही विनंति."

**ज. स. करंदीकर**

( पृ. ७६ वरील टीप पुढें चालू )

वरील पत्रांत श्री. तात्यासाहेब करंदीकरांनीं व्यक्त केलेल्या मतांबद्दल आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. तशाच तऱ्हेचें कमी अधिक अंशानें आधुनिक विद्वानांचें मत, महाराष्ट्रीयांचेंच काय, पण बाहेरसुद्धां बहुतेक भारतीयांचें, त्यांच्यांशीं चर्चा करण्याचा प्रसंग आला असतांना असल्याचें आढळून येईल. कारण त्यांपैकीं बहुतेकांचा, उपनिषदादि ग्रंथांवरून वेदान्त शास्त्राच्याच अध्ययनावर (study) विशेष भर असतो. पण त्या अध्ययनास पार्श्वभूमि म्हणून जरूर असलेल्या साधनचतुष्टयाच्या शास्त्रीय अभ्यासावर (discipline) कांहींच लक्ष नसतें. तसेंच ज्या योगशास्त्राच्या सिद्धांतावर व अनुभवावर वेदान्तशास्त्राचे बहुतेक सिद्धांत आधारलेले आहेत त्या योगशास्त्राचें अध्ययन (study) व अभ्यास (discipline) यांची जोड तर त्यांना मुळींच नसते. त्यांच्या मतानें वेदान्तशास्त्र केवळ बुद्धिवादावर आधारलेलें आहे. हें जरी अंशतः खरें असलें तरी त्यांतील उच्च भूमिकेचे सिद्धांत हे योगशास्त्राच्याच अभ्यासानें आलेल्या अनुभवावर आधारलेले आहेत. उदाहरणार्थ स्थूल, सूक्ष्म, कारणदेह यांची रचना, त्यांचे उपयोग, अवस्था व त्यांच्या सिद्धि 'यावदधिकारं अधिकारिणाम् अवस्थितिः'। या व अशा ब्रह्मसूत्रांतील अनुभव व माहिती यासंबंधींचें ज्ञान एक तर ते उपेक्षित करतात, अगर श्रद्धेवर गृहीत धरतात व त्यांना धरावें लागतें. दुसरें कारण म्हटलें म्हणजे या विद्वानांचा थिऑसफीय पुढाऱ्यांच्या दैनंदिन जीवनाशीं व त्यांच्या विस्तीर्ण वाङ्मयाशीं जितका सहवास असावा तितका नसतो व म्हणून त्यांचें म्हणणें त्यांना विश्वसनीय वाटत नाहीं.

आहे. त्यांत पुढील विधान आहे. 'भविष्यकाळीं अँग्लो-अमेरिकन व ॲंग्लो-सॅक्सन लोकांची राजकीय संघटना व्हावयाची आहे. त्याबाबत कार्य करण्याकरितां ज्यूलिअस सीझर हा पुरुष लवकरच जन्म घेऊन येणार आहे.[1]

ज्यूलिअस सीझर हा प्राचीन काळचा एक सुप्रसिद्ध योद्धा व राजकारणी पुरुष होऊन गेला. तो जन्म घेऊन आला तरी अमुक माणूस हा ज्यूलिअस सीझर आहे असें कोणालाही सिद्ध करून दाखवितां येणार नाहीं. तेव्हां तो गोष्ट जरी खरी झाली तरी तिचा पडताळा देतां येणें शक्य नाहीं व त्यासाठीं हें विधान आम्ही वर दिलेलें नाहीं. त्या विधानांतील 'अँग्लो सॅक्सन व ॲंग्लो-अमेरिकन लोकांची राजकीय संघटना पुढें होणार आहे' या गोष्टीकडे आम्ही आमच्या वाचकांचें लक्ष वेधू इच्छितों. अँग्लो-सॅक्सन लोक म्हणजे स्थूल मानानें इंग्लंडची जनता व ॲंग्लो-अमेरिकन लोक म्हणजे स्थूल मानानें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील जनता या दोघांच्या देशांची राजकीय संघटना होणें ही गोष्ट १९०६ सालीं सर्वांना अशक्य वाटण्याजोगी होती. सुमारें सवाशें वर्षांपूर्वीं जेम्स मनरो हा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष होऊन गेला. त्यानें १८२३ सालीं अमेरिकन प्रजेला एक धोरण आंखून दिलें. त्या धोरणाला Monroe Doctrine असें नांव आहे. या धोरणामुळें मुख्यत: युरोपांतील देशांना अमेरिकेंतील राजकारणांत हस्तक्षेप करण्याची बंदी झाली. अमेरिकेनेंही युरोपांतील राजकारणांत हस्त-क्षेप करावयाचा नाहीं असें ठरविलें. यूरोपांतील देश व अमेरिका यांनीं हें धोरण एक शतकभर पाळलें. यूरोपांत कोणत्याही राजकीय घडामोडी झाल्या तरी त्यांत अमेरिकेनें हात घालावयाचा नाहीं, आणि यूरोपमधील देशांनीं अमेरिकन राजकारणांत पडावयाचें

---

१. Julius Caesar is to come back presently to play some part in an Anglo-American Anglo-Saxon Federation of the future (जिनराजदासकृत) The Return of Julius Caesar पृ. ३

नाहीं, या धोरणानें ते देश चालले; आणि त्या दोघांमध्यें तटस्थपणा निर्माण होऊन कोणत्याही पक्षानें राजकीय किंवा लष्करी शत्रु-मित्रत्वाचे करारमदार वा तह परस्परामध्यें केले नाहींत. अशा रीतीनें परस्परांत मुद्दाम अलिप्तपणा ठेवला गेला, आणि तो तसाच पुढेंही ठेविला पाहिजे असें सर्वांचें मत असतां वेळीं पुढें इंग्लंड व अमेरिका यांची राजकीय संघटना व्हावयाची आहे असें विधान मि. लेडबीटर यांनीं केलें आहे. १९०६ सालीं तें भविष्य अशक्य वाटण्यासारखें कां होतें तें वरील माहितीवरून आमच्या वाचकांच्या ध्यानांत येईल. त्या भविष्यानंतर आठ वर्षांनीं पहिलें जागतिक महायुद्ध युरोपांत सुरू झालें व त्या वेळीं प्रेसिडेंट विल्सन यांनीं अमेरिकेनें स्वत:वर घातलेल्या अलिप्तपणाच्या बंधनाची गांठ प्रथम सोडली. पुढें दुसऱ्या महायुद्धांत जपाननें पर्ल बंदरावर १९४१ च्या डिसेंबरांत एकदम हल्ला केल्यामुळें प्रेसिडेंट रूझव्हेल्ट यांना ती गांठ तोडून टाकणें भाग पडलें; आणि त्यानंतर आजवर कित्येक वर्षें रूझव्हेल्ट, ट्रूमन, आयसेनहोअर, चर्चिल, ॲटली, ईडन वगैरे राजकारणांतील पुढारी परस्परांस भेटून नवें राजकारण शिजवीत आहेत आणि त्यांतून इंग्लंड व अमेरिका यांस एकत्र जोडणाऱ्या कांहीं राजकीय योजना व संघटना निघालेल्या दिसत आहेत. अशा रीतीनें पूर्वीं अशक्यप्राय वाटणारें मि. लेडबीटर यांचें भविष्य आपल्या डोळ्यांसमोर खरें ठरण्याला सुरवात झाली आहे !!

## नवीन मानववंश

आतां एका निराळ्या विषयाकडे दृष्टिक्षेप करूं या. जगांत निरनिराळ्या वंशांचीं माणसें दिसून येत असतात. ब्रह्मी-चिनी-जपानी लोक, इंग्रज-हिंदी लोक, नीग्रो लोक हे पाहिले तर त्यांचे वंश वेगळे दिसतात. आज जगांत कोणताही मानववंश जरी पूर्णपणें शुद्ध राहिलेला नसला, व शरीरसंबंध होऊन जरी कांहीं प्रमाणांत वंशसंकर झालेला असला तरी सध्यांचा चिनी माणूस इंग्रज वा हिंदी माणूस, आणि निग्रो माणूस, यांचे तोंडवळे वेगळे

दिसतात. चिनी माणसाचा चेहरा चौकोनी दिसतो, डोळ्याच्या खालचीं हाडें बटबटीत व वर आलेलीं दिसतात. डोळे कोंजे व लहान व चेहऱ्यावर दाढी मिशा कमी असें दिसतें. निग्रो माणसांचे ओंठ जाडे व केस लोंकरीसारखे दिसतात. इंग्रज किंवा हिंदी माणूस पाहिला तर त्याचे ओठ बेतशीर, चेहऱ्यावर पुष्कळ दाढी-मिशा, चेहरा उभंटा, केंस सडपातळ असें दृश्य दिसतें. असल्या फरकांचा विचार करून शास्त्रज्ञांनीं माणसांचे वेगवेगळे वंश मानले आहेत. थिऑसफीनेंही माणसांचें वंशवार वर्गीकरण केलें आहे. पण थिऑसफींतले पारिभाषिक शब्द भिन्न आहेत. थिऑसफीचें म्हणणें असें आहे कीं, सध्यां पृथ्वीवर तीन मानववंशांचीं माणसें आहेत. पैकीं स्थूल मानानें नीग्रो लोक एका वंशाचे, चिनी-जपानी-ब्रह्मी लोक दुसऱ्या वंशाचे, व इंग्रज-जर्मन-फ्रेंच-हिंदी-पार्शी वगैरे लोक हे तिसऱ्या वंशाचे, असें थिऑसफीचें वर्गीकरण आहे. फार प्राचीन काळीं पृथ्वीवर आणखी दोन वेगळ्या वंशांचीं माणसें होतीं, नंतर ते वंश नष्ट झाले, अशी थिऑसफीची शिकवण असल्यामुळें ते दोन वंश हिशेबांत धरून त्यांच्या मागून आलेल्या नीग्रो लोकांच्या वंशास तिसरा मूलवंश ( किंवा लेम्यूरियन वंश ), त्यानंतर आलेल्या चिनी-जपानी-ब्रह्मी लोकांच्या वंशास चवथा मूलवंश (किंवा अटलॅंटियन वंश) व त्याही नंतर आलेल्या इंग्रज-जर्मन फ्रेंच-हिंदी-पार्शी वगैरे लोकांच्या वशास पांचवा मूलवंश किंवा आर्यवंश) अशीं नांवें थिऑसफीनें दिलेली आहेत. प्रत्येक मूल-वंशाला अनेक उपवंशांच्या शाखा फुटत असतात. दोन भिन्न मूल-वंशाच्या माणसांमध्यें मोठाले फरक असतात. एकाच मूलवंशांतून (Root-Race)भिन्न उपवंश (Sub-races) निघतात, त्यांतही फरक असतात. मात्र ते छोटे असतात. इंग्रज-जर्मन-फ्रेंच-हिंदी-पार्शी हे सगळे पांचव्या मूलवंशाचे (आर्य) आहेत. चिनी-जपानी-ब्रह्मी हे चवथ्या मूलवंशाचे(अटलॅंटियन)आहेत. अर्थात् त्यांमध्यें मोठाले फरक आहेत. पण इंग्रज-जर्मन-फ्रेंच-हिंदी-पार्शी हे जरी सगळे आर्यवंशाचे असले तरी त्यांपैकीं हिंदी माणूस पहिल्या (Indian) उपवंशाचा

आहे, फ्रेंच माणूस चवथ्या (Kelt) उपवंशाचा आहे, पारशी हा तिसऱ्या (Iranian) उपवंशाचा आहे आणि इंग्रजी व जर्मन माणूस पांचव्या (Teuton) उपवंशाचा आहे. या साऱ्या उपवंशांत फरक आहेत, पण दोन मूलवंशांतल्या फरकांच्या मानानें एकाच मूळ वंशांतल्या उपवंशांतले फरक हे लहान असतात असें थिऑसफीचें म्हणणें आहे.

पृथ्वीवर जे मानवी मूलवंश व उपवंश निर्माण होतात, त्यांमध्यें कांहीं सुसंगत योजना असते असें थिऑसफीचें म्हणणें आहे. वंशांमध्यें जे देहविषयक फरक असतात, ते फरक शास्त्रज्ञांनाही मान्य आहेत. पण माणसाला वासनादेह व मनोदेह हे अदृश्य देह असतात व वंशपरत्वें या अदृश्य देहांतही भेद असतात. माणसाचें मन मनोदेह व वासनादेह यांनीं बनत असतें. अर्थात् वंशपरत्वें माणसाच्या मनांतही फरक होतात असें थिऑसफीचें म्हणणें आहे. प्रत्येक मूलवंशांतला मध्यमदर्जाचा मनुष्य घेतला तर त्याच्या देहांत बाह्य भेद असतात, देहाच्या संवेदनक्षमतेंत फरक असतात व मनांतही फरक असतात. उपवंशांतही असेच फरक असतात; मात्र ते लहान प्रमाणांत असतात. उदाहरणार्थ, आर्य वंशांत केल्ट व टयूटन असे जे दोन उपवंश आहेत त्यांतील मध्यम दर्जाचीं (Average) दोन माणसें निवडलीं तर केल्ट माणूस अधिक भावनाप्रधान व अधिक कलाप्रेमी असतो, आणि टयूटन माणूस अधिक बुद्धिप्रधान असतो व त्याला ज्ञानलालसा जास्त असते. सृष्टींत हे मानव वंश हेतुपुरस्सर निर्माण होत असतात. माणसाला निरनिराळ्या वंशांत जन्मास घालावें, व दर जन्मांत त्या त्या वंशांतील विशेष गुण संपादन करण्याची त्याला संधि मिळावी आणि अशा रीतीनें त्याचा गुणविकास अष्टपैलू व्हावा यासाठीं ही वंश व उपवंश यांची सृष्टींत व्यवस्था आहे. म्हणून उत्क्रांतिक्रमांत योग्य वेळीं असे वंश व उपवंश निर्माण होत असतात अशी थिऑसफीची शिकवण आहे.

उत्क्रान्तिक्रमानुसार कोणता मानववंश केव्हां निर्माण होणार आहे ही गोष्ट अंतर्ज्ञानानें माणसाला समजूं शकते. अंतर्ज्ञानाच्या आधारावर थिऑसफीय पुढाऱ्यांनीं अशी घोषणा केली आहे कीं लवकरच पृथ्वीवर एक नवीन वंश हळूहळू प्रकट होणार आहे. हा 'मूळवंश' (Root Race) नाहीं; तर आर्यवंशाचा नवीन 'उपवंश' (Sub–Race) आहे. आर्यवंशाचे पांच उपवंश आज पृथ्वीवर अस्तित्वांत आहेत. तेव्हां या नवीन उपवंशाला सहावा उपवंश (The Sixth Sub–Race) असें नांव देण्यांत आलेलें आहे. थिऑसफीय पुढाऱ्यांचें सांगणें असें आहे कीं या नवीन वंशांतल्या माणसांची शारीरिक ठेवण कांहींशी निराळी होईल. प्रथम अगदीं लहान लहान शारीरिक फरक उत्पन्न होतील, हळूहळू ते मोठे होतील, प्रथम थोडया माणसांत ते फरक दृष्टोत्पत्तीस येतील, कालगत्या असल्या माणसांची संख्या वाढेल व मानवी संस्कृतीचें एक विशेष कार्य या उपवंशाच्या माणसांच्या हातून होईल.[१] या माणसांच्या मनाचे गुणधर्मही वेगळे असतील. जिला आपण मराठींत स्फूर्ति किंवा अंतःप्रज्ञा म्हणतों, 'मनसस्तुः परा बुद्धिः ।' असें जिला गीतेंत म्हटलें आहे, जिला इंग्रजींत Intuition म्हणतात ती गोष्ट या

---

१. मि. लेडबीटर म्हणतात: This work is small yet, but it is destined to swell into voluminous proportions, until within a few short centuries, the sixth sub–race will stand out distinct and admirable in its young manhood. ( पहा The Masters and the Path १९२७ पृ. ३६६ )

श्री. अरविंद योगी यांचेंही अंतर्ज्ञानावर आधारलेलें म्हणणें याच प्रकारचें आहे. ते म्हणतात: Now there will be established on earth a gnostic consciousness and power which will shape a race of gnostic spiritual beings. ( पहा शिशिर कुमार-मित्रकृत The Liberator Shri Aurobindo पृ. १९६–१९८ ) श्री. अरविंदांनीं आपलें अंतर्ज्ञान स्वतंत्रपणानें मिळविलेलें आहे. तेव्हां ह्या साम्यांत दोघांच्या अंतर्ज्ञानाच्या सत्यतेचा पुरावा आहे हें उघड आहे.

मानववंशांतील लोकांमध्यें जास्त प्रमाणांत प्रकट व्हावयाची आहे. सध्यांच्या जनतेंत साधकबाधक प्रमाणांचा विचार करून निर्णय देणारें मन विकसित झालेलें आहे. त्या मनाला तर्कशास्त्राचा युक्तिवाद करतां येतो; पण तर्काच्या पेक्षां श्रेष्ठ अशी एक ज्ञान-शक्ति अस्तित्वांत आहे. त्या शक्तीच्या साहाय्यानें माणसाला बुद्धिवाद केल्याशिवाय सत्य समजण्याचें सामर्थ्य येतें. या शक्तीला आम्ही येथें स्फूर्ति किंवा अंत:प्रज्ञा असें नांव देत आहों. आजच्या जनतेमध्यें ही अंत:प्रज्ञा फारशी दिसून येत नाहीं. नवीन उप-वंशांत ती हळूहळू वाढत्या प्रमाणांत दिसून येईल आणि हल्लीचा मध्यम (average man) दर्जाचा माणूस घेतला आणि भावी उप-वंशांतला मध्यम (average man) दर्जाचा माणूस घेतला तर त्यांच्यांत अंत:प्रज्ञेबाबत मोठेंच अंतर असल्याचा अनुभव येईल. या उपवंशाची सुरवात जगांत सध्यांच अनेक ठिकाणीं होऊं घातली आहे; पण प्रामुख्यानें ती अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें व आस्ट्रेलिया, न्यूझीलंड या देशांत होणार असल्याचें थिऑसफीय पुढाऱ्यांनीं सांगितलें आहे.[१]

---

१. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं म्हटलें आहे 'The forth-coming Sub-race may begin very soon ( Secret Doctrine खंड ३ पृ १५४ तळटीप ) Occult philosophy teaches that even now, under our very eyes the new race and races are preparing to be formed, and that it is in America that the transformation will take place and has already silently commenced.......The Americans are in short the germs of the sixth sub-race and in some few hundred years more will become most decidedly the pioneers of that race. (Secret Doctrinsखंड ३ पृ. ४४२ ) असें म्हटलें आहे. डॉ. बेझंट यांनीं या मुद्द्यासंबंधानें दिलेलीं The Coming Race व The Sixth Sub-Race हीं दोन व्याख्यानें त्यांच्या The Changing World नांवाच्या

( टीप पुढील पानावर चालू )

या गोष्टीचेंही आज आपल्या डोळ्यांसमोर प्रत्यंतर येऊं लागलें आहे. माणसाच्या शारीरिक ठेवणीमध्यें होणारे हे फरक आज बीजरूप आहेत. पण ते कित्येक लोकांना ओळखूं येऊं लागलेले आहेत. विशेषतः ते कॅलिफोर्निया, आस्ट्रेलिया, न्यू-झीलंड या देशांत अधिक दृग्गोचर होत आहेत. डॉ. बेझंट व मि. लेडबीटर या थिऑसफीय पुढाऱ्यांनीं म्हटलें आहे कीं आमच्या त्या देशांतील प्रवासांत आम्हांला हे फरक दाखविणारीं माणसें ठिकठिकाणीं आढळलेलीं आहेत.[१] सन १९२३ सालीं ब्रिटिश असो-सिएशनसमोर कॅप्टन पेप यांनीं एक व्याख्यान दिलें होतें. त्यांत या माणसांस Austral-American Race असें नामाभिधान देऊन त्यांच्या शारीरिक ठेवणीचें त्यांनीं बारकाईनें वर्णन केलेलें आहे. असल्या वर्णनांत Brachiocephalous Dolichocephalus सारखे पारिभाषिक शब्द येतात. त्यांत चेहेऱ्यांचीं मोजमापें दिलेलीं असतात व तोंडवळ्याच्या निरनिराळ्या भागांचे बारकावे नमूद असतात. ज्यानें या शास्त्राचा विशेष अभ्यास केलेला नसेल त्याला या गोष्टी नीटशा समजत नाहींत. म्हणून तो तपशील आम्ही येथें देत नाहीं. डॉ.हृडलिट्स्का ( Dr. Hrdlicka )नांवाचे अमेरिकेंत

( टीप मागील पानावरून पुढें चालू )

पुस्तकांत आहेत. मि. लेडबीटर यांनीं या विषयावर एक पुस्तक लिहिलें आहे. त्याचें नांव Australia and New Zealand, the Home of a New Sub-Race (१९१५) असें आहे. त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं या नवीन उपवंशाची सुरुवात ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड या देशांतही होत आहे. मि. लेडबीटर यांच्या The Masters and the Path (आवृत्ति १९२७) यांत पृ. ३६६ ते ३७१ वर ही विषय आलेला आहे.

१ मि. लेडबीटर म्हणतात When I landed here in Australia for the second time a year ago, (म्हणजे १९१४ सालीं) I was much

(टीप पुढील पानावर चालू)

एक प्रसिद्ध मानवशास्त्रज्ञ (Anthropologist) आहेत. त्यांनाही या वंशाच्या अस्तित्वाचा ओळख पटली आहे. या वंशांतील देहविशेष कोणते आहेत त्याची माहिती त्यांनींही दिली आहे आणि या वंशाला New American Type असें नांव ठेवलेलें आहे.[1]

---

( टीप मागील पानावरून चालू )

struck with the fact that the new race was obviously showing itself here also. I had not expected that...But I saw at once that here were children and young people of a distinctly new type, more especially in Queensland (Australia and New zealand, the Home of a New Sub-Race पृ २–३) डॉ. ॲनी बेझंट यांनीं या नवीन उपवंशाबद्दल पुढील उद्‌गार काढले आहेत : This time is marked by the coming of the new sub-race, in California especially. There it has drawn great attention and it is no longer a matter of Theosophical assertion... They cannot deny it any longer except as ignorant people can deny anything. (पहा The Work of The Ruler and The Teacher 1930 पृ. ४, Adyar Pamphlet क्रमांक १३५).

१. कॅप्टन पेप यांनीं केलेलें वर्णन लेडबीटर कृत The Masters and the Path आवृत्ति १९२७ यांत पृष्ठ ३६९ वर सांपडेल. डॉ. हृडलिट्स्का (Hrdlicka)यांचे विचार कांगा कृत Where Theosophy and Science Meet (द्वितीयावृत्ति खंड २) या पुस्तकांत पृ. ७५–७७ वर नमूद आहेत.

## प्रकरण ६ वें

# पाश्चिमात्य देश व हिंदुस्थान

गेल्या पन्नास वर्षांत पाश्चिमात्य देश व पौर्वात्य देश—विशेषतः हिंदुस्थान—यांच्या संबंधांमध्यें मोठाले बदल झाले आहेत. त्या विषयींचे पडताळे या प्रकरणांत आमच्या वाचकांसमोर ठेवण्याचा आमचा मनोदय आहे.

डॉ. बेझंट यांचीं दोन व्याख्यानें The East and the West and Destinies of Nations ह्या नांवाच्या पुस्तिकेंत प्रसिद्ध झालेलीं आहेत.[1] राष्ट्राराष्ट्रांच्या भवितव्याच्या पाठीमागें अदृश्य सृष्टींतली कोणतीं सूत्रें असतात याचें विवेचन या व्याख्यानांत त्यांनीं केलेलें आहे. पहिल्या व्याख्यानाच्या प्रारंभीं डॉ. बेझंट यांनीं पुढील विधान केलेलें आढळतें. 'पूर्वेकडील राष्ट्रें व पश्चिमेकडील राष्ट्रें यांचीं फार पूर्वींच्या काळापासून जीं देणींघेणीं आहेत त्यांचा हिशेब होऊन विसाव्या शतकांत तीं निकालांत काढलीं जाणार आहेत असें मॅडम ब्लॅव्हॅट्स्कीबाई आम्हांस सांगत असत.' व्यक्तीं-मध्यें जशीं त्यांच्या कर्माचीं देणीं घेणीं असतात तशीं राष्ट्रांमध्येंही

---

१ Adyar Pamphlet नं. ५३ ही वरील नांवाची पुस्तिका आहे. तींत हीं दोन व्याख्यानें आहेत. हीं व्याख्यानें वाचलीं तर रूसो-जपानी युद्ध संपल्यानंतर लगेच तीं दिलेलीं आहेत असें स्पष्ट दिसतें. ॲडमिरल टोगो यांनीं मे १९०५ मध्यें रशियन आरमाराचा जपाननजीक सत्यानाश केल्या-मुळें रूसो-जपानी युद्ध संपलें. तेव्हां हीं व्याख्यानें १९०५ सालच्या दुसऱ्या सहामाहींत दिलेलीं असावीं असें वाटतें.

असतात.[१] एका माणसानें दुसऱ्याशीं बरें वाईट वर्तन केलें असल्यास त्याचा परिणाम होऊन त्या माणसास सुखदुःखाची परिस्थिति प्राप्त होते व तदनुसार कांहीं घटना त्याच्या आयुष्यांत घडून येतात. एका राष्ट्रानें स्वतःच्या अंतर्गत कारभारांत किंवा दुसऱ्या राष्ट्राशीं बरें वाईट वर्तन केलें असलें तर त्या वर्तनाचाहि कर्मदृष्टचा परिणाम होऊन त्या राष्ट्रामध्यें अनेक सुखदुःखांच्या घटना घडत असतात. माणूस जसा सुखदुःखें सोसून शहाणपणा शिकतो तद्वत् राष्ट्रांनाही सुखदुःखांच्या परिस्थितींत घालून कर्माचा नियम त्यांना शहाणपण शिकवीत असतो. बहुतेक बलाढ्य राष्ट्रें इतर राष्ट्रांवर नाहक आक्रमण करून त्यांना पादाक्रांत करतात; पण एकादें राष्ट्र सामर्थ्यवान् असूनही शांततेचें धोरण स्वीकारतें. बहुतेक बलाढ्य राष्ट्रें जिंकलेल्या लोकांवर जुलूम करतात; पण एकादें राष्ट्र त्यांशीं न्यायानें वागतें. बहुतेक बलाढ्य राष्ट्रें इतर देशांचा व्यापार बुडवितात; पण एकादें राष्ट्र त्यांशीं सहकार्याचें धोरण ठेवतें. बहुतेक बलाढ्य राष्ट्रें दर्पानें फुगून जाऊन इतर देशांतल्या लोकांना, त्यांच्या धर्माला, त्यांच्या संस्कृतीला त्यांच्या वर्णाला हीन समजतात व तदनुसार स्वतःचें धोरण आंखतात. पण एकादें राष्ट्र असें दर्पानें फुगून जात नाहीं. कांहीं राष्ट्रांचे पुढारी आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांना समान राजकीय हक्क देतात. पण कांहीं राष्ट्रांचे पुढारी आपल्या प्रजाजनांतही पंक्तिप्रपंच करतात, आणि विशिष्ट जातीच्या, वर्णांच्या

---

१ उपरोक्त पुस्तकाच्या पृ. १ वर पुढील वाक्य आहे: 'In this twentieth century, as **H. P.** Blavatsky told us, some of the long-standing accounts between eastern and western nations are to be settled.' मॅडम ब्लॅव्हॅट्स्की १८९१ सालीं वारल्या. डॉ. बेझंट यांनीं त्यांचें हें विधान १९०५ सालीं सर्वांसमोर मांडलें. त्या विधानाचे पडताळे १९०५ नंतर पुष्कळ वर्षांनीं हळूहळू आले हें पुढील मजकुरावरून वाचकांच्या लक्षात येईल.

वा धर्मांच्या लोकांना इतरांइतके हक्क देत नाहींत. कांहीं राष्ट्रांचे पुढारी सर्व देशाची भरभराट व्हावी असें धोरण ठेवतात तर कांहीं राष्ट्रांचे पुढारी विशिष्ट लोकांच्या फायद्यासाठीं जनतेवर जुलूम करून तिला पिळून काढतात. गेल्या शतकांत कांहीं देशांनीं गुलामांचा व्यापार बंद करण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले, तर कांहीं देशांनीं त्या प्रयत्नांना विरोध केला हें आमच्या वाचकांना माहीत असेल. सर्व राष्ट्रें अशीं भलींबुरीं धोरणें आखीत असल्यामुळें राष्ट्रांच्या अंतर्गत व्यवस्थेंत आणि राष्ट्रांराष्ट्रांमध्यें कर्माचीं देणीं घेणीं निर्माण होत असतात. त्यामुळें राष्ट्रांराष्ट्रांत भिन्न घटना उत्पन्न होतात, पूर्वी बलाढ्य असलेलीं स्पेन-पोर्तुगालसारखीं राष्ट्रें सर्व जगांत मागें पडतात. पूर्वी महत्त्वहीन असलेला इंग्लंडसारखा किंवा अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानासारखा देश पुढें येतो. जर्मनी-सारखा एकादा देश पुनः पुनः युद्धांत हरतो, स्वित्झर्लंड-स्वीडन-सारख्या देशांना सभोवार युद्धाचा वणवा पेटला असतांहि त्याची झळ लागत नाहीं. माणसांमाणसांच्या सुखदुःखांमध्यें व त्यांच्या परस्परांमधील ऋणानुबंधामध्यें उच्चनीचतेचे पुष्कळ फरक दिसून येतात व ते अंशतः त्या माणसांच्या सध्यांच्या वागणुकीवर (क्रियमाण कर्मावर) व पूर्वी केलेल्या कृत्यांवर (पूर्वकर्मावर) अवलंबून असतात. त्याचप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांच्या सुखदुःखामध्यें व त्यांच्या परस्परांतील ऋणानुबंधामध्यें जी उच्चनीचतेची विविधता दिसते ती जरी त्या राष्ट्रांच्या सध्यांच्या परिस्थितीवर व धोरणावर सर्वस्वीं अवलंबून आहे असें लौकिक दृष्टीला दिसलें तरी तें खरें असत नाहीं. अंशतः तो श्रेष्ठ कनिष्ठपणा, ती प्रगति-अधोगति, ती विविधता राष्ट्रांच्या पूर्वकर्मावरही अवलंबून असते. पूर्वकर्मामुळें राष्ट्राराष्ट्रांत देणीं घेणीं उत्पन्न होत असतात व तीं दिल्याघेतल्याविना गत्यंतर नसतें. पौर्वात्य व पाश्चात्य राष्ट्रांमध्यें जीं असलीं पूर्वकालीन देणीं घेणीं सांचलेलीं आहेत त्यांचा निकाल विसाव्या शतकांत व्हावयाचा आहे असें जें वर मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांचें म्हणणें आम्ही नमूद केलें आहे त्याचा अर्थ आमच्या वाचकांना आतां स्पष्ट झाला असेल.

## राष्ट्रांचीं देणीं-घेणीं

हे देण्याघेण्याचे हिशेब आज आपल्या डोळ्यासमोर केले जात आहेत. कांहीं हिशेबांचे निकाल पुरे झाले आहेत व कांहींचे होऊं घातले आहेत. विसावें शतक उजाडण्याच्या सुमारास या हिशेबांस सुरवात झाली. पौर्वात्य व पाश्चात्य राष्ट्रांत निरनिराळ्या गोष्टी घडल्या, निरनिराळ्या अडचणी निर्माण झाल्या, तीं सारीं राष्ट्रें निरनिराळ्या परिस्थितींत सांपडलीं, आणि त्याचा परिणाम म्हणून देण्याघेण्याचे निकाल होऊं लागले. विसावें शतक सुरू झाल्यापासून आज जीं पन्नासांवर वर्षे लोटलीं त्यांत कोणत्या क्रमानें काय काय गोष्टी घडल्या हा इतिहास पहाण्यासारखा आहे. सतराव्या व अठराव्या शतकांत इंग्लड, फ्रान्स, बेल्जम्, हॉलंड वगैरे देशांतील लोकांनीं साम्राज्यवाद स्वीकारून हळू हळू जगांतील निरनिराळे देश काबीज केले व तेथें आपली सत्ता प्रस्थापित केली. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या उपरोक्त विधानांतील पाश्चिमात्य राष्ट्रें म्हणजे स्थूलमानानें युरोपांतील राष्ट्रें होत व पौर्वात्य राष्ट्रें म्हणजे आशियाई राष्ट्रें होत हें उघड आहे. इंग्लडनें हिंदुस्थान, ब्रह्मदेश, मलाया व सीलोन या देशांत सत्ता स्थापिली. फ्रान्सनें इंडोचायनांत स्थापिली. डच (हॉलंड) लोकांनीं इंडोनेशियांत (सुमात्रा, जावा, बलि, बोर्नियो वगैरेंत) स्थापिली. ही सत्ता स्थापतांना युरोपांतील गोऱ्या लोकांनीं आशियांतील काळ्या लोकांशीं लढाया करून त्यांना हळू हळू मागें हटविलें व त्यांवर वर्चस्व स्थापिलें. त्याचा परिणाम म्हणून आम्ही गोरे लोक जन्मजात श्रेष्ठ जातीचे आहों अशी अभिमानाची भावना युरोपियन लोकांमध्यें निर्माण झाली व ते सारे काळ्या लोकांना कमी लेखून त्यांना तुच्छतेच्या भावनेनें वागवूं लागले.

ही वृत्ति जोरावर असतांना विसाव्या शतकाच्या प्रारंभीं बोअर युद्ध सुरू झालें. (१८९९ ते १९०२) हें युद्ध जिंकतांना इंग्लंडला फार प्रयास पडले. प्रारंभीं मूठभर बोअर लोकांनींच इंग्लडवर

मात केली; तेव्हां इंग्रजसरकारनें लॉर्ड राबर्टस् यांस मुख्य सेनापति नेमलें आणि हळू हळू त्यांनीं इंग्लडला जय मिळवून दिला. युद्ध जिकण्यासाठीं हिंदुस्थानांतील गुरख्यांचें सैन्य आपण बोअर लोकांशीं लढण्याकरितां उपयोगांत आणावें अशी लॉर्ड राबर्टस् यांची इच्छा होती व इंग्रजसरकारला त्यांनीं तशी विनंतीही केली होती. बोअर लोक म्हणजे मूळचे गोरे डच लोक; ते आपले शत्रु असले तरी काळ्या लोकांहून ते जन्मजात उच्च प्रतीचे; तेव्हां गुरख्यांच्या काळ्या सैन्याला ह्या गोऱ्या लोकांवर गोळ्या झाडण्यास शिकविलें तर गोऱ्यांची इभ्रत ती काय राहिली? मग जगभर काळ्या लोकांवर गोऱ्यांचा दरारा कसा रहाणार? असा विचार करून इंग्रजसरकारनें लॉर्ड रॉबर्टस् यांच्या विनंतीला वाटाण्याच्या अक्षता लावल्या व बोअर युद्धासाठीं त्यांना काळें सैन्य दिलें नाहीं. जर्मनीचा राजा कैसरही इंग्रजांस म्हणू लागला कीं जरूर तर मी तुम्हांस गोरें जर्मन सैन्य मदत म्हणून देतों पण काळे शिपाई तुम्ही बोअर युद्धांत नेऊं नका.

पुढें दोन वर्षांनीं म्हणजे इ. स. १९०४ च्या फेब्रुवारींत रूसो-जपानी युद्ध सुरू झालें. हें काळ्यागोऱ्यांचें युद्ध होतें. या युद्धांत काळे लोक संपूर्णपणें विजयी होतील ही कल्पना युरोपांतल्या गोऱ्या लोकांच्या स्वप्नांतही आलेली नव्हती. पण जपान्यांनीं रशियाला चारी मुंडे चीत केलें. जपानचा नाविक सेनापति ॲडमिरल टोगो यानें १९०५ च्या मे महिन्यांत रशियाच्या आर-माराला एकदम जलसमाधि दिली व रशियन नाविक सेनापति रोजडेसविन्स्की याला पकडलें. त्यामुळें लगेच युद्ध संपलें व विजय-श्रीची भरघोस माळ जपानच्या गळ्यांत पडली. या विजयानें काळ्यांची प्रतिष्ठा युरोपांत व सर्व जगांत वाढली. आपण गोऱ्यांच्या मानानें कमी आहों असा पुष्कळ काळ्या लोकांना जो न्यूनगंड वाटत होता तोही नष्ट झाला. आणि सर्व आशियायी राष्ट्रें जागीं झालीं.

पुढें दहा वर्षांनीं युरोपांतलें महायुद्ध सुरू झालें. त्यांत इंग्लंड व फ्रान्स एका बाजूस व जर्मनी दुसऱ्या बाजूस होता. जर्मनीनें युद्धाची

तयारी पूर्वींपासून केलेली होती. इंग्लंडनें तशी तयारी केलेली नव्हती. त्या वेळीं फ्रान्स-इंग्लंड यांना पुरेशा सैन्याची निकड भासली आणि इंग्लंडनें आपलें पूर्वींचें धोरण बदलून व कोणतेही आढेवेढे न घेतां हिंदुस्थानांतील काळे सैनिक गोऱ्या जर्मनांशीं लढण्याकरितां पाठवून दिले! फ्रान्सनेंही आपल्या हाताखालच्या वसाहतींतील काळे सैनिक आणविले. त्या वेळीं लार्ड हार्डिज हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होते. त्यांनीं इतक्या मोठ्या प्रमाणावर हिंदी सैन्य यूरोपांत पाठविलें, कीं ती संधि साधून हिंदुस्थानावर दुसऱ्या कोणी त्यावेळीं स्वारी केली असती, तर हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं पुरेसें सैन्य हिंदुस्थानांत राहिलेलें नसल्यमुळें इंग्रजांची पांचावर धारण बसण्याची पाळी आली होती !

पुढें जर्मनीचा पराभव होऊन व्हर्सायचा तह करण्यांत आला. त्या तहावर काळ्या हिंदुस्थानच्या प्रतिनिधीलाही सही करण्याची संधि मिळाली. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर प्रेसिडेंट वुईल्सन यांच्या प्रेरणेनें त्या तहावरोबर राष्ट्रसंघ ( लीग ऑफ नेशन्स ) ही अनेक राष्ट्रांची संस्था अस्तित्वांत आली व तींतही काळ्या हिंदुस्थानचा प्रतिनिधि बसूं लागला. मुख्यतः इंग्लंडला जास्ती मतें हवीं होतीं म्हणून ही व्यवस्था करण्यांत आली, पण त्या व्यवस्थेमुळें काळ्या लोकांचा ( विशेषतः हिंदुस्थानचा )जागतिक दर्जा वाढण्यास अप्रत्यक्षपणें मदत झाली.[१]

१ व्हर्सायच्या तहावर श्री. श्रीनिवास शास्त्री व बिकानेरचे महाराज यांच्या सह्या आहेत. राष्ट्रसंघ ( League of Nations ) ही संस्था त्या तहांतील प्रारंभींच्या कलमानुसार अस्तित्वांत आली. तींतही हे दोघे होते. बिकानेरच्या महाराजांनीं इंग्रजसरकारास पहिल्या महायुद्धांत मदत केली असल्यामुळें त्यांना संस्थानिकांचे प्रतिनिधी म्हणून निवडण्यांत आलें होतें. श्री. शास्त्री यांची निवड ते जहाल मताचे नसल्यामुळें झाली होती. (पहा पट्टाभिसीतारामय्या कृत History of the Congress, १९३५, पृ. ५५९–६०१ , विशेषतः त्यांत दिलेलें हिंदुस्थानचे सेक्रेटरी ऑफ स्टेट मि. वेजवुड बेन यांचें म्हणणें; तसेंच चित्रावकृत अर्वाचीन चरित्र कोशांतील पृ. ४५७ वरील बिकानेरच्या महाराजांचें चरित्र)

या पहिल्या जागतिक महायुद्धानंतर ( १ ) लहान राष्ट्रांना जगण्याचा हक्क आहे व ( २ ) प्रत्येक देशाला स्वयंनिर्णयाचा अधिकार असून आपलें राजकीय भवितव्य आपल्या मर्जीनुरूप ठरविण्याचें स्वातंत्र्य त्याला मिळालें पाहिजे या दोन घोषणा सर्व जगांत करण्यांत आल्या. त्या घोषणांना गोऱ्या राष्ट्रांची मान्यता मिळाली आणि आशियायी राष्ट्रांना विशेषत: हिंदुस्थान देशाला त्या घोषणांचा फायदा मिळून हिंदी राष्ट्रीय सभेच्या राजकारणाचें सुकाणू हिंदी पुढाऱ्यांनीं त्या दिशेनें वळविण्यास सुरवात केली.

दुसरें महायुद्ध १९३९ च्या सप्टेंबरांत सुरू झालें. १९४१ च्या डिसेंबरांत जपान देश अमेरिका-इंग्लंड-फ्रान्स यांचा शत्रु म्हणून युद्धांत पडला आणि १९४२ च्या फेब्रुवारींत जपाननें सिंगापूर हस्तगत करून व ब्रह्मदेश लवकरच घशाखालीं घालून हिंदुस्थानांत शिरण्याचा उद्योग चालविला. अर्थात् हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांची युद्धाला सहानुभूति मिळविणें, या गोष्टीची इंग्लंडला निकड उत्पन्न झाली आणि १९४२ च्या मार्च महिन्यांत हिंदी पुढाऱ्यांशीं बोलणीं करण्याकरितां इंग्लिश सरकारला सर स्टफर्ड क्रिप्स् यांस हिंदुस्थानांत पाठवावें लागलें. परिस्थिति अशी निर्माण झाली होती कीं 'आम्हांला अमुक अमुक द्या' अशी तोंड वेंगाडून हिंदी पुढारी पूर्वीं इंग्रजांकडे भिक्षां देहि करीत; तें सर्व जाऊन 'तुम्हांला काय हवें' तें त्यांना विचारण्याकरितां एका ब्रिटिश मुत्सद्द्याला हिंदुस्थानांत यावें लागलें. त्यानें काळ्या लोकांचें महत्त्व वाढलें. पुढें हें महायुद्ध संपल्यानंतर कांहीं काळ दोघा पक्षांत बोलणीं सुरू होतीं. इंग्लडनें १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानला प्रथम 'डोमिनियन स्टेटस्' दिलें व शेवटीं आपल्या पार्लमेंटांत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा कायदा Indian Independence Act संमत करून हिंदुस्थानला पूर्णपणें स्वतंत्र केलें !

साम्राज्यशाहीच्या काळांत इंग्लंडनें हिंदुस्थानांत नानाप्रकारचे अन्याय केले होते. पुढें इंग्लंडचें हिंदुस्थानांत राज्य सुरू झालें. त्या

राज्यांत पुष्कळ गोष्टी अनिष्ट असल्या तरी इंग्रजांनीं हिंदी जनतेला इंग्लिश भाषारूपी 'वाघिणीचें दूध' पाजलें. त्या भाषेमुळें हिंदुस्थानांत राजकीय स्वातंत्र्याचें नवजीवन संचरू लागलें, अखिल हिंदुस्थानामध्यें प्रांतिक, व जातीय भावना कमजोर होऊन एक-राष्ट्रीयत्वाची भावना फोंफावली, सरकारच्या कारभारामध्यें चोखपणा, व्यवस्थितपणा, न्यायीपणा, वगैरे गुणांची वाढ झाली व इंग्लंडसदृश लोकशाही राज्यपद्धतीचा पाया घालण्यांत आला. एकाद्या माणसानें (किंवा राष्ट्रानें) दुसऱ्या माणसाशीं (किंवा राष्ट्राशीं) वाईट वर्तन केलें असल्यास त्या कर्माची फेड दोन तऱ्हेनें होऊं शकते. दुःख भोगणें ही एक तऱ्हा. मुद्दाम चांगलें वर्तन करून पूर्वींच्या वाईट वर्तनाचे परिणाम पुसून टाकणें ही दुसरी तऱ्हा. एका माणसानें दुसऱ्याचे पैसे बुडविले असले किंवा दुसऱ्यास दुखापत केली असली तर त्या माणसाचे पैसे बुडून किंवा त्याच्या देहास इजा होऊन तें दुष्कर्म फिटूं शकेल. किंवा केलेल्या नुकसानीची त्या माणसानें भरपाई केल्यास अथवा त्या दुसऱ्या माणसाची आजारांत शुश्रूषा केल्यास त्यानेंही तें कर्म फिटेल. राष्ट्रांसही तोच न्याय लागू आहे. इंग्लडनें हिंदुस्थानांत पूर्वीं दुष्कर्म केलें होतें. हिंदुस्थानांत राज्यकारभाराच्या व इतर कित्येक चांगल्या गोष्टी करून व शेवटीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य देऊन इंग्लंडनें त्या हिशेबाची निष्कृति करून टाकिली.

सीलोन व ब्रह्मदेश यांचेही हिशेब इंग्लंडनें त्याच प्रकारानें मिटविले. मलायाचे हिशेब अद्याप मिटले नाहींत; पण मिटण्याच्या मार्गावर दिसत आहेत.

हॉलंड व फ्रान्स यांनीं इंग्लंड इतका समंजसपणा दाखविलेला नाहीं. त्यांनीं इंडोनेशियांतील व इंडोचायनांतील लोकांचा अंत पहाण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें इंडोनेशियन जनता व डच लोक यांमध्यें युद्ध सुरू झालें. पण लगेच संयुक्तराष्ट्रसंघाच्या आज्ञेनें दोन्ही युध्यमान पक्षांना शस्त्रसंधि (Cease fire) करावा लागला. पुढें बाटाघाटी सुरू झाल्या आणि शेवटीं इंडोनेशियांतील बेटेंही

स्वतंत्र होऊन त्यांचा हिशेब पुरा झाला. इंडोचायनाचें राजकारणही अलीकडे त्याच वळणावर जात असून आज त्यांचा हिशेबही पुरा होण्याच्या मार्गास लागलेला सध्यां दिसत आहे. अशा रीतीनें मॅडम ब्लॅव्हॅट्स्कीबाई यांचें वर उद्धृत केलेलें विधान खरें झालेलें आहे.

## हिंदुस्थानचें स्वातंत्र्य

हिंदुस्थान देश स्वतंत्र होईल याबद्दलची अंतर्ज्ञानानें मिळविलेली माहितीही थिऑसफीय पुढाऱ्यांनीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलेली आहे, व या अंतर्ज्ञानाचा संपूर्ण पडताला आज मिळालेला आहे. डॉ. बेझंट यांस अंतरंगाच्या भूमिकेवर १५ आगस्ट १९१५ रोजीं कांहीं ज्ञान देण्यांत आलें[1] व तें महत्त्वाचें असल्यामुळें त्यांनीं त्याचें

---

१ या गोष्टीची माहिती थिऑसफीय वाङ्मयांत अनेक ठिकाणीं दिलेली आढळेल. उदाहरणार्थ जिनराजदास कृत The War and After या पुस्तिकेंत पृ. २६ वर ती माहिती आहे. ही पुस्तिका म्हणजे १९३९ च्या डिसेंबरांत श्री. जिनराजदास यांनीं अड्यार, मद्रास, येथें दिलेलें व्याख्यान होय. जिनराजदास लिहितात : 'The instructions which she (Annie Besant) received were precise. They were as follows, Received on August 15, 1915 and written down by her on that day. डॉ. बेझंट यांनीं केलेल्या टिपणांतील जी माहिती जिनराजदास यांनीं तेथें नमूद केलेली आहे तींत हिंदी राजकीय चळवळीच्या भवितव्याबद्दल पुढील वाक्य आहे : " The end will be a great triumph " डॉ. बेझंट यांनीं केलेल्या त्या वेळच्या टिपणाचा फोटो व इतर माहिती Dr. Besant's Occult Life या नांवाच्या जिनराजदास यांच्या लेखांत थिऑसफिस्ट मासिकाच्या मे १९३३ सालच्या अंकामध्यें पृ. १४५–१४८ वर वाचकांस सापडेल. त्या लेखांत श्री. जिनराजदास लिहितात कीं हें अंतर्ज्ञान स्वतःला मिळाल्याबद्दलची माहिती डॉ. बेझंट यांनीं त्याच दिवशीं मला सांगितली पण त्या माहितीची मी परिस्फुटता करूं नये असें त्यांनीं मला बजाविलें!

तात्काळ टिपण केलें. त्या टिपणांत हिंदुस्थानच्या राजकारणाचा उल्लेख आहे व 'हिंदी राजकीय चळवळीचें पर्यवसान मोठ्या विजयानंदांत होईल' असें भविष्य त्यांत नमूद आहे.

इतर क्षेत्रांपेक्षां राजकारणाच्या क्षेत्रांतील वातावरण अधिक अस्वच्छ असतें. राजकारणांत अनेक पक्ष व उपपक्ष असतात. प्रत्येक पक्ष दुसऱ्या पक्षाचा पाडाव करून स्वतःची सरशी करण्यास झटत असतो. राजकारणांत वारंवार निवडणुकी व्हाव्या लागतात. व प्रतिपक्षीयांचीं उणीं काढणें, त्यांचे दोष तिखट मीठ लावून सांगणें, नसलेले दोष त्यांच्या अंगीं चिकटवणें, आपले दोष लपवून व गुण फुगवून जनतेसमोर मांडणें वगैरे गोष्टी निवडणुकीच्या वेळीं लोक करीत असतात. त्यांत खोट्यानाट्या गोष्टींचीही भर घातली जाते. राजकारणांत मानमरातब, लोकप्रियता, सत्ता व संपत्ति मिळविण्याच्या जागा वगैरेसाठीं लोकांची चढाओढ सुरू असते. म्हणून देशभक्ति व जनसेवेचा हव्यास असणारीं जशीं अनेक माणसें राजकीय क्षेत्रांत असतात, तशीं स्वार्थी, लबाड, महत्त्वाकांक्षी व संधिसाधुही माणसें पुष्कळ असतात. अर्थात् ह्या क्षेत्रांत पुष्कळंदा व्यक्तीव्यक्तीमध्यें हेवेदावेही उत्पन्न होतात. जी गोष्ट सयुक्तिक आहे किंवा पुराव्यानें सिद्ध करण्याजोगी आहे, ती एकाद्या राजकीय पक्षाला अनुकूल नसली तर तो त्या गोष्टीला विद्रूप स्वरूप देऊन तिचें महत्त्व नष्ट करीत असतो. त्यामुळें एकादी सयुक्तिक गोष्टही राजकारणांत सांगण्यापूर्वीं मागचा पुढचा विचार करणें जरूर होतें. अंतर्ज्ञान ही गोष्ट अशी आहे कीं ती पुराव्यानें सिद्ध करतां येत नाहीं. ती सयुक्तिक असल्याचेंही निश्चितपणें दाखवितां येत नाहीं. जेव्हां भविष्य काळीं ती गोष्ट खरी होईल तेव्हांच अंतर्ज्ञानाची सत्यता माणसाला पटणार. राजकारणांतील एकादी महत्त्वाची गोष्ट माणसाला अंतर्ज्ञानानें समजली तर त्याला आपलें राजकारणांतील 'धोरण तदनुसार बदलणें जरूर असतें. या सर्व कारणांस्तव अंतर्ज्ञानाची कोणतीही गोष्ट राजकारणांत परिस्फुट

करणें फार धोक्याचें असतें. परिस्फुट केल्यास प्रतिपक्षीयांकडून भलत्या हेतूंचा माणसावर आरोप लादला जाण्याचा संभव उत्पन्न होतो.

म्हणून अंतर्ज्ञान असूनही डॉ. बेझंट यांनीं हिंदी राजकारणांतील कित्येक गोष्टी त्या वेळीं उघड केल्या नाहींत. त्या युरोपियन असल्यामुळें हिंदी लोकांपैकीं पुष्कळांना त्यांचा विश्वास वाटत नसे. राजकारणांत त्यांनीं हिंदी लोकांची बाजू उचलून धरली असल्या-मुळें आपल्या इंग्रज जातभाईनाही त्या अप्रिय झाल्या होत्या. तेव्हां उपरोक्त दिवशीं त्यांना अंतरंगाच्या भूमिकेवर मिळालेले हिंदी राजकारणाविषयींचें ज्ञान त्यांनीं या कारणास्तव बराच काळ गुलदस्तांत ठेवलें याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.[1]

---

१ थिऑसफिकल सोसायटीतील कांहीं लोकांना डॉ. बेझंट यांनीं या गोष्टी १५ आगस्ट १९१५ नंतर लवकरच खासगी रीतीनें कळविल्या. या पुस्तकाच्या दोघाही लेखकांस त्या अशा रीतीनें समजल्या. त्या सार्व-जनिक रीतीनें त्यांनीं प्रथम सर्वांसमोर नक्की केव्हां मांडल्या तें आम्हांस माहीत नाहीं. डॉ. बेझंट यांची १९३० सालची The Work of the Ruler and the Teacher नांवाची एक पुस्तिका आहे. (पहा Adyar Pamphlet नं. १३५ पृ. १ व २) तींत डॉ. बेझंट लिहितातः

'I want my co-workers now to understand this; because of course this policy is to continue during the very critical time that lies in front. There is no longer any need not to say that it is the Inner Government of the World that formulated that policy in the outside world. It was that which led me to oppose Gandhiji.' थिऑसफिस्ट मासिकाच्या मे १९३३ च्या अंकांत या गोष्टी प्रसिद्ध झाल्याबद्दलचा उल्लेख आम्ही वर केलाच आहे. १९३० सालच्या अगोदर त्यांनीं या गोष्टी जाहीर रीतीनें जगासमोर मांडल्या होत्या कीं काय व मांडल्या असल्या तर प्रथम केव्हां मांडल्या तें आज निश्चितपणें सांगणें सोपें नाहीं.

हें अंतर्ज्ञान डॉ. बेझंट यांना केव्हांही मिळालेलें असलें तरी तें १९३०–१९३३ च्या सुमारास सार्वजनिक रीतीनें प्रसिद्ध करण्यांत आलें. त्या वेळींही हिंदी राजकारणाच्या चळवळीचें पुढें काय होईल हें निश्चितपणें सांगणें शक्य नव्हतें. त्यानंतर चवदा वर्षांनीं 'हिंदी राजकीय चळवळीचें पर्यवसान मोठ्या विजयानंदांत होईल' ( The end will be a great triumph ) हें त्यांच्या टिपणांत लिहिलेलें वाक्य खरें झालें !

## हिंदुस्थानचा राष्ट्रकुलांत समावेश

इ. स. १९१० सालीं डॉ. बेझंट यांचा एक लेख प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं आर्यवंशाच्या वडील शाखेचे लोक (म्हणजे हिंदी लोक) व आर्यवंशाच्या तरुणतम शाखेचे लोक (म्हणजे इंग्रज लोक) हे पुढें एकवटणार आहेत. ते एकवटून त्या दोघांचे ऋणानुबंध निकटपणाचे, बंधुत्वाचे व अभंग असे व्हावयाचे आहेत आणि त्यांतून एक मोठें साम्राज्य निर्माण होणार आहे. **ह्या गोष्टी अटळ आहेत.**[1]

रंगभूमीवर चालू असलेल्या नाटकाच्या पाठीशीं जसें नाटकाचें संविधानक असतें, तद्वत् इतिहासाच्या पाठीशीं एक योजना असते

---

१ डॉ. बेझंट यांचा हा लेख सेंट्रल हिंदु कॉलेजच्या मासिकांत १९१० च्या ऑक्टोबर अंकांत प्रसिद्ध झालेला होता. तो Annie Besant, Builder of New India या पुस्तकांत पृ. ५०७ वर The Coming Aryan Empire या मथळ्याखालीं पुनः मुद्रित केलेला आहे. त्यांत डॉ. बेझंट म्हणतात And above all, the eldest and the youngest children of the Aryan race, the Indian and the English will be blended together. On this Union, close, brotherly, indissoluble, the future Empire depends. And it is inevitable. (या अवतरणांत मूळचें लांब वाक्य छोटें करून देण्याकरितां कांहीं शब्द मागें पुढें करावे लागले आहेत.)

व त्या योजनेला धरून इतिहासांतील गोष्टी घडत असतात असें डॉ. बेझंट यांचें म्हणणें असे. वरील लेख समग्र वाचल्यास वाचकांस समजून येईल कीं अशा एका योजनेचें आपणांस अंतर्ज्ञान आहे, व त्या योजनेनुसार हिंदीलोक व इंग्रज लोक यांचे संबंध आज जोडले गेले आहेत, पुढें ते घनिष्ठ होतील, हिंदीलोक व इंग्रज लोक यांच्यामध्यें एकोपा व बंधुत्व हीं निर्माण होतील व त्यांतून आर्य लोकांचें अतिविस्तीर्ण व महाप्रभावी असें राज्य निर्माण होईल असें डॉ. बेझंट सांगत आहेत. या मुद्द्याचा त्यांनीं आपल्या इतर लेखांत अधिक खुलासा केलेला आहे. तो असा: सध्यांचें ब्रिटिश साम्राज हें सहजासहजीं निर्माण झालेलें नाहीं. त्याच्या पाठीमागें एक योजना आहे. इंग्लड, कॅनडा, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड वगैरे देशांचें एक साम्राज्य त्या योजनेनुसार सध्यां बनत आहे. अर्धवट बांधून झालेल्या इमारतीप्रमाणें तें आज विचित्र दिसत असलें तरी त्यांत नवीन खोल्या, नवीन गच्च्या, व नवीन मजले पुढें हळूहळू बांधले जाऊन तें टुमदार दिसेल.हें राज्य आर्यवंशांतल्या लोकांचेंच होणार आहे. जुन्या काळच्या साम्राज्यांत एक देश दुसऱ्यास गुलाम करून त्यांच्यावर सत्ता गाजवी. या नव्या साम्राज्यांत सर्व देश स्वतंत्र रहातील, त्यांचें नातें बरोबरीचें ठेवण्यांत येईल आणि त्या सर्वांचें मिळून एक नव्या धर्तीचें राज्य होईल. या राज्याला Empire किंवा साम्राज्य असें जुनें नांव द्या, अथवा Commonwealth किंवा संघराज्य असें म्हणा, त्यांतील सर्व देश स्वतंत्र रहातील, त्यांचा जगांत एक विधायक व परस्पर साह्यकारी गट बनेल व तो सर्वत्र पसरलेला असल्यामुळें मानवी हिताच्या नव्या नव्या राजकीय, आर्थिक, आरोग्यविषयक व सांस्कृतिक योजना आंखून तो गट त्या अंमलांत आणील. इतिहासांतील योजनेची ही पुढची पायरी आहे. या पुढच्या पायरीवर मनुष्यें येऊन उभीं राहिलीं म्हणजे असल्या संघराज्यापासून होणारे फायदे त्यांच्या डोळ्यांत भरतील, व सर्व जगाचें एक राज्य करण्याची

त्याच्या पुढची जी पायरी आहे ती त्यांना व्यवहार्य वाटेल; आणि त्यानंतर सर्व जगाचें एक संघराज्य बनेल अशी डॉ. बेझंट यांची विचारसरणी आहे.[1]

आमच्या वाचकांपैकीं पुष्कळांना डॉ. बेझंट यांची विचारसरणी पटणार नाहीं हें आम्ही जाणून आहों. पण ही विचारसरणी पटो वा न पटो, त्यांतील पहिली गोष्ट आज सर्वांच्या नजरेसमोर खरी झालेली आहे आणि हिंदुस्थान पाकिस्तान आणि सिलोन हे तिन्ही देश ब्रिटिश राष्ट्रकुलांत आपण होऊन सामील झाले आहेत, हें आमच्या वाचकांनीं लक्षांत ठेवावें. हे तिन्ही देश स्थूलमानानें आर्य-वंशीय लोकांचे आहेत. ब्रह्मदेशाची जनता स्थूलमानानें मंगोलियन वंशाची आहे. आपण होऊन ब्रह्मदेश या राष्ट्रकुलाच्या बाहेर राहिला आहे ही गोष्टही लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

---

१. पहा डॉ. बेझंट यांचें The Great Plan (१९२०) नांवाचें पुस्तक त्यांत त्यांनीं इतिहासाच्या पुढच्या पायऱ्यांचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे: The next stage of the plan is the building-up of a free Commonwealth of Nations in which India plays her equal part. That is why the English came here. And the one nation that is free in her institutions in her own island is the English Nation, chosen to come here and blend with the Indian Nation in the building up now of the World Empire, to be really a world Commonwealth .... a World Federation which is to govern by love and in peace. India and Britain are to be the main constituents of the Commonwealth which is to be the main model of the World Commonwealth of the future. It is a model on a small scale of Intrernationalism. हें वर्णन Annie Besant Builder of New India या पुस्तकांत पृ. ५०३ वरही दिलेलें आहे. वरील इंग्रजी अवतरण छोटें पण सुसंगत व्हावें म्हणून क्वचित् एकादा शब्द आम्हांस करावा लागला आहे.

हिंदुस्थान व इंग्लंड यांतील लोक एकवटणार आहेत व असें होणें अटळ (inevitable) आहे असें डॉ. बेझंट यांनीं १९१० सालीं[1] म्हटलें होतें. ब्रिटिश राष्ट्रकुलांत हिंदुस्थाननें येणें हा त्या मार्गावरचा पहिला टप्पा आहे, व आपखुषीनें त्या राष्ट्रकुलांत हिंदुस्थाननें येऊन डॉ. बेझंट यांचें विधान खरें करून दाखविलें आहे.

हिंदुस्थाननें आपण होऊन ब्रिटिश राष्ट्रकुलांत सामील व्हावें ही गोष्ट लौकिकदृष्टया सर्वस्वी अनपेक्षित आहे. जगांतील बहुतेक सर्व राजकारणी पुरुषांचें सध्यांचें ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य हें आहे. स्वतंत्र

---

१. मागें पृ. ९६ पहा. मास्टर के. एच. यांनीं १८८३ सालीं मि. सिनेट यांस लिहिलेल्या एका पत्रांत पुढील वाक्य आहे : 'The Indo-British nation is the pulse I go by' त्यावरून हें भविष्यज्ञान त्यांना १८८३ सालच्या अगोदर झालें होतें असें ठरतें. (पहा बार्करकृत Mahatma Letters आवृत्ति ८ पृ. ३८१ )

इंग्रजी राज्याचें नांवही कसें बदलत गेलें तें पहाण्यासारखें आहे. १९०० च्या अगोदर या राज्यास ब्रिटिश साम्राज्य ( British Empire ) असें म्हणत. पण साम्राज्य (Empire) शब्दांत जुलमी सत्तेचा अंतर्भाव होतो, तसा ध्वनि त्यांतून निघूं नये म्हणून पांचवे जार्ज सर्व साम्राज्यांतून हिंडून आल्यानंतर त्यांच्या प्रेरणेनें साम्राज्य (Empire) शब्द काढून त्या राज्याला ब्रिटिश राष्ट्रकुल (British Commonwealth) असें नांव देण्यांत येऊं लागलें. पण त्या नांवांतूनही ब्रिटिश लोकांचा वरचष्मा असल्याचा ध्वनि निर्माण होतो. तो घालविण्यासाठीं डॉ. बेझंट, कर्नल वेजवुड वगैरे पुढाऱ्यांनीं Indo-British Commonwealth हिंदी-ब्रिटिश राष्ट्रकुल या नांवाचा उपयोग करण्यास सुरवात केली. (पहा Annie Besant, Builder of New India पृ. १८५ ) नंतर बाई Commonwealth of Free Nations (स्वतंत्र देशांचें राष्ट्रकुल) असें नवीन नांव योजूं लागल्या. त्या नांवांत कोणत्याही देशाचा नामनिर्देश नसल्यानें तें नांव कोणासही बोंचण्यासारखें नाहीं. आज तें नांव सर्वसंमत झालेलें आहे. जसजसें नांव सुधारत गेलें तसतसें राज्यांतील घटकांचे संबंधही सुधारत गेलेले आहेत.

देशांनीं आपापल्या अनिर्बध स्वातंत्र्यास थोडीशी मुरड घातली आणि अशा देशांनीं एक संघराज्य स्थापलें तर तें अधिक फायदेशीर होईल ही कल्पना खरी असली तरी ती आज फारशी कोणास आवडत नाहीं. हिंदुस्थानांतील राष्ट्रीय सभेनें प्रारंभीं पुष्कळ वर्षें ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वातंत्र्याची मागणी केली होती, पूर्ण स्वातंत्र्याची मागणी केली नव्हती हें खरें आहे; पण याचें अंतस्थ कारण मुख्यतः असें होतें कीं संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी केल्यास तो राजद्रोह ठरून मागणी करणाऱ्याला तुरुंगवास घडण्याचा संभव होता. यासाठीं राष्ट्रीयसभेंत प्रारंभीं निर्भेळ स्वातंत्र्याची मागणी केलेली नव्हती. पुढें हिंदी राजकारणांत महात्मा गांधींचें वर्चस्व प्रस्थापित झाल्यावर राष्ट्रीय सभेनें पूर्ण स्वराज्य हें आपलें ध्येय ठरविलें व मद्रास कॉंग्रेसमध्यें १९२७ सालीं त्या आशयाचा ठराव प्रथम संमत करून घेतला.[१] पूर्ण स्वराज्य म्हणजे इंग्रज लोकांशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नसलेलें निर्भेळ स्वातंत्र्य. हा ठराव श्री. जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या १९२९ सालच्या लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें जोराची खडाजंगी होऊन मोठ्या हिरीरीनें पुन्हां पास करण्यांत आला. नंतर कंठाळी ठराव म्हणून १९४७ पर्यंत कॉंग्रेसच्या दर अधिवेशनामध्यें पुनःपुन्हां तो संमत करण्यांत येत असे. ब्रिटिश साम्राज्यांत कॅनडा, ऑस्ट्रेलिया वगैरे देश समाविष्ट आहेत. त्यांना 'डोमिनियन्स' म्हणतात. डोमिनियन्स हीं जवळजवळ स्वतंत्र आहेत; पण ब्रिटिश साम्राज्यांत सामील असल्याचा त्यांच्या कपाळावर शिक्का आहे, व शंभर नंबरी निर्भेळ स्वातंत्र्यापेक्षां डोमिनियन्सचें स्वातंत्र्य दोनतीन कसांनीं कमी आहे. आम्हांला हें डोमिनियन्सचें स्वातंत्र्य नको, आम्हांला इंग्रजांचे सर्वच संबंध तोडावयाचे आहेत, हें ध्येय कॉंग्रेसनें पुढें जनतेसमोर ठेवून लोकप्रिय

---

१ या ठरावांत Independence is our immmediate goal असें म्हटलें आहे.

केलें, व डोमिनियन्सचें स्वातंत्र्य (Dominion status) मागणें म्हणजे नामर्दपणा होय अशी भावना देशांत निर्माण केली. नंतर दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर गांधी-नेहरू प्रभृति पुढाऱ्यांनीं 'हिंदुस्थान छोडो' (Quit India) ची घोषणा करून इंग्रजांना हिंदुस्थानांतून बाहेर घालवून देण्याची चळवळ सुरू केली. तेव्हां हेच कॉंग्रेस पुढारी पुढें आपण होऊन ब्रिटिश राष्ट्रकुलांत रहावयास तयार होतील हें शक्य दिसत नव्हतें. पण ही अशक्य वाटणारी घटना पंडित नेहरूंच्या प्रतिमेमुळें साकार झाली. अशा रीतीनें डॉ. बेझंट यांनीं १९१० सालीं सांगितलेली गोष्ट आपण आपल्या डोळ्यांनींआज खरी ठरलेली प्रत्यक्ष पहात आहों! !

## हिंदुस्थान व पाकिस्तान

आणखी एक हिंदुस्थानविषक पडताळा दाखल करून हें प्रकरण संपवूं या. Man: Whence, How & Whither नांवाचा एक थिऑसफीय ग्रंथ सन १९१३ सालीं डॉ. बेझंट व लेडबीटर यांनीं प्रसिद्ध केलेला आहे. मनुष्य जातीच्या पूर्वेतिहासाचें योगसिद्धीच्या साहाय्यानें केलेलें संशोधन त्यांत प्रामुख्यानें दिलेलें आहे. भविष्य काळीं मानव जातीची प्रगति कशी होईल याबद्दलचें एक प्रकरण या पुस्तकाच्या शेवटीं आलेलें असून त्याचें नांव The Beginnings of the Sixth Root-Race असें आहे. भविष्यकाळीं एका नवीन मानववंशाला सुरवात होणार आहे, त्या वेळीं एक नवीन तऱ्हेची वसाहत अमुक एक ठिकाणीं स्थापण्यांत येईल असें त्या प्रकरणांत सांगितलेलें असून त्या वसाहतीची सविस्तर माहिती त्यांत दिलेली आहे. मि. लेडबीटर यांनीं अदृश्य सृष्टीचें संशोधन करून ही माहिती संपादन केलेली आहे. त्या भविष्यकाळीं एकंदर जगांत काय काय घटना होतील त्याचें मुद्दाम संशोधन करण्याचा मि. लेडबीटर यांचा हेतु नव्हता. पण वर दिलेल्या वसाहतींविषयींचें संशोधन करतांना सहजासहजीं जगांतील इतर गोष्टींची कांहीं

माहिती त्यांच्या नजरेसमोर आली, व ती त्यांनीं या भागांत थोडक्यांत दिली आहे. त्यांत हिंदुस्थानाबद्दल पुढील विधान आहे : या देशांत गट पडून दोन किंवा तीन मोठीं राज्यें झालेलीं आहेत, पण हा देश अद्यापि ही एका विस्तीर्ण साम्राज्याचा घटक आहे.[१]

हें विधानही आज सत्याच्या कसोटीस उतरलें आहे. हिंदुस्थान देश १९४७ सालीं जेव्हां स्वतंत्र झाला त्या वेळीं हिंदुस्थानची फाळणी करून हिंदुस्थान व पाकिस्तान अशीं दोन राज्यें निर्माण करण्यांत आलीं. पाकिस्तानचे पूर्व पाकिस्तान व पश्चिम पाकिस्तान असे दोन तुकडे आहेत. पाकिस्तान एक मानलें तर हिंदुस्थानांत दोन राज्यें होतात. पाकिस्तानचे दोन तुकडे हिशेबांत धरले तर तीन राज्यें होतात. हिंदुस्थान देशांत दोन किंवा तीन राज्यें झालेलीं दिसतात हें मि. लेडबीटर यांनीं सन १९१३ सालीं केलेलें विधान आज अशा रीतीनें तंतोतंत खरें झालेलें आहे!

हिंदुस्थानची फाळणी होऊन त्यांत एकापेक्षां अधिक स्वतंत्र राज्यें होतील ही कल्पना अगदीं अलीकडच्या काळापर्यंत कोणा पुढाऱ्याच्या स्वप्नांतही आलेली नव्हती. १९१३ सालीं तिला लोकांनीं (पाकिस्तानचे जनक मि. जिना यांनींही) वेडगळ, अशक्य व अव्यवहार्य अशीं विशेषणें लाविलीं असतीं. पण ती गोष्ट १९१३सालीं मि. लेडबीटर यांनीं अंतर्ज्ञानाच्या आधारावर जगासमोर मांडली व त्यानंतर चौतीस पस्तीस वर्षांनीं ती खरी झाली!

या प्रकरणांत, तसेंच मागील प्रकरणांत आम्ही राजकारणांतील अनेक मुद्दे वाचकांसमोर मांडले आहेत व त्याचें विवरण करतांना एका विशिष्ट राजकीय विचारसरणीचा अवलंब केला आहे. राजकारणांत अनेक पक्ष व उपपक्ष असतात; व प्रत्येकाची राजकारण-

---

१ Man: Whence, How & Whither (१९१३) पृ. ४६३ वर हिंदुस्थानासंबंधीं पुढील उल्लेख आहे. " The Country groups itself into two or three big Kingdoms, but is still a part of one great Empire."

विषयक विचारसरणी वेगळी असल्यामुळें लोकांमध्यें पदोपदीं मतभेद होत असतात. तेव्हां आमची विचारप्रणाली आमच्या वाचकांना बरोबर वाटेलच असें नाहीं. ती त्यांना बरोबर वाटावी अशी आमची अपेक्षाही नाहीं. आमची राजकीय विचारसरणी वाचकांना पटवून द्यावी यासाठीं आम्ही हें पुस्तक लिहिलेलें नाहीं. अदृश्य सृष्टींचें संशोधन करून व अंतर्ज्ञानाच्या आधारावर राजकारणासंबंधींचीं कित्येक विधानें थिऑसफीय पुढाऱ्यांनीं पूर्वी केलेलीं होतीं, व तीं विधानें आज खरीं झालेलीं आहेत इतकेंच आम्हांस दाखवावयाचें आहे; व त्याबद्दल मतभेद होण्यास जागाच नाहीं. हिटलर देशभक्त होता कीं नाहीं, चर्चिल हा लबाड आहे कीं काय, ब्रिटिश राट्रकुलांत सामील होणें कितपत शहाणपणाचें आहे, हिंदुस्थानची फाळणी करण्याची जबाबदारी कॉंग्रेसवर आहे, कीं हिंदुमहासभेवर आहे, कीं मुस्लीम लीगवर आहे, कीं इंग्रजांवर आहे या प्रश्नांबद्दल मतभेद होऊं शकतील; पण दुसऱ्या महायुद्धांत हिटलर हरला व चर्चिल जिंकला, हिंदुस्थान देश ब्रिटिश राष्ट्रकुलांत समाविष्ट झाला आणि हिंदुस्थानची फाळणी होऊन भारत व पाकिस्तान अशीं दोन राज्यें अस्तित्वांत आलीं या गोष्टी मतभेदांतील आहेत. त्या आज घडल्या आहेत आणि त्यामुळें त्यांत अंतर्ज्ञानाच्याखरेपणाचा पडताळा मिळत आहे, इतकेंच आमचें म्हणणें आहे .आमचे वाचक कोणत्याही राजकीय पक्षाचे असले तरी त्यांस वरीलपडताळे मान्य करण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं हें उघड आहे

### प्रकरण ७ वें

# कार्यकारी माणसांची निवड

या प्रकरणांत वेगळ्या प्रकारचे पडताळे सांगून अंतर्ज्ञानाच्या सत्यतेचा कांहीं निराळा पुरावा आम्ही आमच्या वाचकांसमोर ठेवणार आहों. थिऑसफिकल सोसायटीच्या पुढाऱ्यांनीं स्वतःच्या अंतर्ज्ञानाच्या जोरावर कांहीं बाराचौदा वर्षांची लहान मुलें होतकरू म्हणून निवडावीं व पुढें तीं खरोखरींच होतकरू ठरून नांवालौकिकास चढावीं असें झालेलें आहे. ती हकीकत या प्रकरणांत द्यावयाची आहे.

## सी. जिनराजदास

पहिलें उदाहरण सी. जिनराजदास यांचें घेऊं. त्यांचा जन्म सीलोनांत १८७५ सालीं झाला. त्या नंतरच्या काळांत थिऑसफिकल सोसायटीचे त्या वेळचे अध्यक्ष कर्नल ऑलकॉट हे सीलोनांत सोसायटीचें एक मोठें कार्य करण्यांत गुंतले होते. सीलोनी लोकांचा धर्म बुद्धधर्म होय. पण १८८५ च्या अगोदर बुद्धधर्माला सीलोनांत बिलकुल मान नव्हता. ख्रिश्चन मिशनऱ्यांचें त्या वेळीं सीलोनांत वर्चस्व होतें. त्यांच्या खटपटीमुळें पुष्कळ सुशिक्षित लोक बुद्धधर्म सोडून ख्रिश्चन झालेले होते. बऱ्याच शिक्षणसंस्था त्यांच्या ताब्यांत होत्या. सन १८८०–१८८५ च्या अगोदरच्या कालखंडांत जशी महाराष्ट्रांत (व हिंदुस्थानांतही) स्थिति होती, तशीच सीलोनांतही होती. इंग्रजांच्या सुधारणेनें जनता दिपून गेलेली होती. इंग्रजाचें सर्वच चांगलें व आपलें सर्वच वाईट असें बुद्धिमान् लोकांनाही वाटूं लागलें होतें व इंग्रजी सुधारणेच्या अंधानुकरणाची वृत्ति जनतेंत जोरावर होती. कर्नल ऑलकॉट व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की

यांना सीलोनांतील ही दु:स्थिति सुधारावयाची होती. बुद्धचरित्राबद्दल व बुद्धधर्माबद्दल जनतेंत आदर व स्वाभिमान निर्माण करणें व बुद्धधर्मीय मुलांना बुद्धधर्माचें शिक्षण देणाऱ्या संस्था स्थापन करणें या गोष्टींची त्या वेळीं जरुरी होती. हें काम त्यांनीं १८८० सालानंतर सुरू केलें. त्या सालीं कर्नल ऑलकॉट व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं प्रचंड सभेंत पंचशील ग्रहण करण्याचा धार्मिक विधि करून बुद्ध धर्माचा सार्वजनिक रीतीनें स्वीकार केला. दोन गोऱ्या माणसांनीं बुद्धधर्माचा प्रकट सभेंत स्वीकार केल्यामुळें बुद्धधर्माबद्दलची जनतेची अवहेलनाबुद्धि ओहोटूं लागली. पुढें त्यांनीं पुष्कळ शिक्षणसंस्था काढल्या, त्यांत बुद्धधर्माचें शिक्षण देण्याची सुरवात केली अणि अशा रीतीनें बुद्धधर्मांत नवचैतन्य ओतलें.

या कार्यास साहाय्य देण्यासाठीं थिऑसफिकल सोसायटीचे एक पुढारी मि. लेडबीटर हे १८८५ सालीं सीलोनांत गेले होते. त्यावेळीं त्यांचें वय चाळिशीच्या घरांत आलेलें होतें. शाळा काढणें, विद्यार्थी गोळा करणें, त्यांना पोहावयास शिकविणें, त्यांच्या बरोबर सहल करण्यास जाणें, वगैरे पडतील तीं कामें ते करीत. त्या वेळीं त्यांनीं कोलंबो येथें एक शाळा काढली होती. तींतूनच कोलंबोचें सध्यांचें सुप्रसिद्ध आनंद कॉलेज निर्माण झालेलें आहे.

त्यांच्या एका शाळेंत १८८६ सालीं सी. जिनराजदास हे विद्यार्थी म्हणून प्रविष्ट झाले. सी. जिनराजदास त्या वेळीं ११ वर्षांचे होते. त्यांचा व मि. लेडबीटर यांचा शाळेंत संबंध आला. मि. लेडबीटर यांचें मन आकर्षण करील अशी एकही बहिरंगाची गोष्ट त्या मुलांत नव्हती. त्याचे आईबाप म्हणजे सामान्य दर्जाचीं माणसें होतीं. त्यांच्या पाशीं पैशाचीही माया नव्हती. मुलगाही चलाख बुद्धीचा व परीक्षांत पुष्कळ मार्क मिळविणारा असा नव्हता. पण या मुलांत कांहीं विशेष आहे, आपला त्याचा पूर्वजन्मींचा ऋणानुबंध आहे असें मि. लेडबीटर यांनीं अंतर्ज्ञानानें ओळखलें. हा मुलगा होतकरू आहे, तो जगांत पुढें कांहीं महत्त्वाचें कार्य करील असें त्यांना तें अंतर्ज्ञान

सांगूं लागलें.[१] तेव्हां त्यांनीं त्या मुलाशीं मैत्री जोडली. अकराबारा वर्षांचा 'काळ्या' वर्णाचा मुलगा व चाळीस वर्षांचा गोरा साहेब यांची ही मैत्री पाहून लोकांना तींत विचित्रपणा दिसल्याशिवाय राहिला नसेल !

या मुलाला उत्कृष्ट शिक्षण मिळावें अशी मि. लेडबीटर यांची महत्त्वाकांक्षा होती. कारण उत्कृष्ट शिक्षण नसलेल्या माणसाला कोणतेंही महत्त्वाचें जागतिक कार्य करणें जड जातें. तेव्हां या मुलाला केंब्रिज विश्वविद्यालयाचा पदवीधर करावें असें मि. लेडबीटर यांच्या मनानें घेतलें. पण तेव्हांच्या काळीं थोडेच लोक विलायतेस जात असल्यामुळें ती गोष्ट जवळ जवळ अशक्य होती. एक अडचण पैशाची होती. मि. लेडबीटर यांचेपाशीं फारसे पैसे नव्हते. पैशाशिवाय केंब्रिज विश्वविद्यालयाचें महागाईचें शिक्षण या मुलानें कसें संपादावायचें? मित्रांच्या साह्यानें ही अडचण दूर करतां आली तरी ह्या मुलाला शिक्षणाकरितां विलायतेस कसें नेतां येणार? त्याचे आईबाप मध्यम स्थितींतले व चारचौघांप्रमाणें वागणारे होते. मुलानें दोन तीन वर्षें त्या शाळेंत शिकल्यावर त्यानें आईबापांपाशीं हळूंच विलायतेस जाण्याची गोष्ट काढून पाहिली. पण वडील माणसें म्हणालीं, आपण कांहीं गर्भश्रीमंत नाहीं. तरीही आम्ही तुला कोलंबोच्या सरकारी कॉलेजांत घालून पदवीधर करूं व तितकें शिक्षण तुला पुरेसें आहे. मुलगा आतां तेरा चौदा वर्षांचा झाला होता. तेरा चौदा वर्षांच्या सिंहली

---

१. त्यांना या मुलाबद्दल काय वाटलें तें This boy is one of the Mastesr people and he will play a role on the world stage या शब्दांत ग्रथित आहे. ( पहा जिनराजदास कृत Occult Investigation, १९३८ पृ.१२४) या मुलाबद्दलचें अंतर्ज्ञान त्यांनीं कोठून मिळविलें होतें तें या पुस्तकांत पृ. ११६–११७ वर दिलेलें आहे. पूर्वजन्मीचा या दोघांचा काय ऋणानुबंध होता त्याचा संक्षिप्त उल्लेखही तेथेंच आढळेल. त्या पूर्व ऋणानुबंधाची एक रोमांचकारी कथा आहे. ती The Perfume of Egypt ह्या पुस्तकांत Saved by a Ghost या मथळ्याखालीं दिलेली आहे.

मुलानें चाळीस वर्षांच्या गोऱ्या साहेबाबरोबर त्यांच्या आग्रहास्तव व पुरेसे पैसे गांठीं नसतांना शिक्षणाकरितां विलायतेस जावें ही कल्पना सर्वांनाच वेडगळपणाची वाटण्यासारखी होती. तेव्हां मि. जिनराजदासांच्या आईबापांनीं तिला स्पष्टपणें नकार दिला यांत नवल नाहीं. पण मि. लेडबीटर यांना स्वतःच्या अंतर्ज्ञानाची पूर्ण खात्री होती व ते आपला विचार इतरांच्या भीडमुर्वतीसाठीं सोडून देण्यास बिलकूल तयार नव्हते. या काळीं इंग्लडांत मि. सिनेट नांवाचे एक सुप्रसिद्ध थिऑसफिस्ट रहात होते. मि. लेडबीटर यांचा मि. सिनेट यांशीं चांगला स्नेहसंबंध होता. मि. सिनेट यांना आपल्या मुलाच्या शिक्षणाकरतां त्या काळीं एक खाजगी शिक्षक ठेवावयाचा होता. मि. लेडबीटर हेही त्याच्या शिक्षणाचें काम अंगावर घेण्यास तयार झाले होते. त्यासाठीं त्यांना इंग्लंडांत जाऊन राहाणें अवश्य होतें. मी जर एक सिंहली मुलगा येथून बरोबर आणला, तुमच्या घरीं त्याला ठेवलें व मी दोघा मुलांचें एकत्र शिक्षण केलें तर तुम्हांला चालेल का? असें मि. लेडबीटर यांनीं मि. सिनेट यांना विचारलें, आणि मि. सिनेट यांनीं त्यांना होकार दिला. अशा रीतीनें सन १८८९ सालीं या मुलासमोर इंग्लंडला जाण्याची संधि सहजासहजीं दत्त म्हणून उभी राहिली!

पण आईबापांची परवानगी नसतांना हा मुलगा विलायतेस जाणार कसा? मुलाला जाण्याची हौस वाटत होती. पण तेरा चौदा वर्षांचा हा मुलगा, त्याच्या हौशीला विचारतो कोण? त्या सुमारास कोलंबो बंदरांत एक बोट आली होती; व लवकरच ती केप ऑफ गुडहोप मार्गानें इंग्लंडला जावयास निघणार होती. मि. लेडबीटर हे आपल्या शाळेंतल्या मुलांना शिकवून पोहण्यांत तरबेज करीत असत; व एकाद्या गलबतावर नेऊन तेथून त्यांना पाण्यांत बुड्या मारण्याचें शिक्षण देत असत. तसें करीत असतांना त्यांना या बोटीच्या कार्यक्रमाची बातमी लागली आणि लेडबीटर यांनीं बोटीच्या अधिकाऱ्याशीं रदबदली करून या मुलाला बोटींतून विलायतेस जाण्याची परवानगी मिळविली. इकडे मुलानें

घरांतून पळून जावयाचें ठरविलें. एके दिवशीं संध्याकाळीं तो घरांतून पळाला व समुद्रकांठाशीं आला. तेथें मि. लेडबीटर आलेले होते. त्यानें आपला कोट व धोतर मि. लेडबीटर यांचे हवालीं केलें. त्या वेळीं काळोख झाला झाला होता. पावसाळी वाऱ्यामुळें समुद्रांत मोठ्या लाटाही हेलावत होत्या. मुलानें नागवें होऊन लेडबीटरच्या सांगण्यावरून समुद्रांत उडी टाकली व कांहीं अंतरावर एक होडी होती, तेथें तो पोहत गेला. त्या होडींतल्या माणसांनीं त्याला वर घेतलें; ती होडी त्या बोटीची होती. होडींतून तो बोटीवर गेला, व ती रात्र व पुढचे दोन दिवस त्यानें त्या बोटीवरील केबीनमध्यें गुपचुपपणें काढले.

इकडे मुलाच्या घरांत गोंधळ माजला. मुलगा पळाला व त्याचा मागमूस लागत नाहीं हें पाहून घरची मंडळी घाबरली. या कारवाईंत लेडबीटर यांचा हात आहे अशी जबरदस्त शंका बापाला होती. त्यानें लेडबीटर यांजकडे जाऊन त्यांना तंबी दिली, त्यांच्या समोर पिस्तुल रोखलें; पण लेडबीटर यांचेकडून त्याला मुलाचा ठावठिकाणा मिळूं शकला नाहीं. पुढें कांहीं काळ लोटल्यावर कुटुंबांतील मंडळींनीं माघार घेतली, व बापानें मि. लेडबीटर यांना सांगितलें कीं जर तुम्हीं मुलाची व आमची भेट करून दिलीत तर आम्ही मुलाला तुमच्या बरोबर विलायतेस शिक्षणास जाण्यास खुषीनें परवानगी देऊं. ती बोट लवकरच निघायची होती; पण कांहीं अडचण येऊन निघण्याचा दिवस लांबणीवर पडला होता. त्यामुळें मि. लेडबीटर यांना ही हकीकत बोटीवरील मुलाला कळवितां आली. नंतर मुलगा घरीं आला. मग घरच्या वडील माणसांनीं त्याला विलायतेस जाण्याची परवानगी दिली व मि. लेडबीटर व हा मुलगा दोघे बरोबर निघून १८८९ च्या नवंबरांत विलायतेस जाऊन पोहोंचले.[1]

१ ही हकीकत आम्ही श्री. जिनराजदास यांचे तोंडून ऐकलेली आहे. पिस्तुल रोखल्याची हकीकतही त्यांच्या बोलण्यांत आलेली होती. The Occult Investigations नामक त्यांच्या पुस्तकांतही पृ. ११५-१२३ वर ती त्यांनीं विस्तारानें दिलेली आहे.

पुढें विलायतेंस मि. लेडबीटर यांनीं मि. जिनराजदास यांचें शिक्षण अनेक अडचणी सोसून पुरें केलें. पैशाच्या अभावीं दोघांना पुष्कळ हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. पण त्यांतून दोघांनीं मार्ग काढला. १८९६ सालीं मुलाचें दुय्यम शिक्षण संपून मुलानें केंब्रिजच्या सेंट जॉन कॉलेजमध्यें आपलें नांव दाखल केलें व १९०० सालीं मि.जिनराजदास हे केंब्रिज विश्वविद्यालयाचे पदवीधर झाले!

पुढें काय झालें तें पहा. पदवीधर झाल्यावर त्यांनीं स्वतःला थिऑसफिकल सोसायटीच्या कार्याला सर्वस्वी वाहून घेतलें व सर्व आयुष्य त्यांत वेचलें. ते चांगले वक्ते होते. इंग्रजी, फ्रेंच, इटलियन, स्पॅनिश, व पोर्तुगीज या भाषांत ते भाषणें करूं शकत. त्यांनीं थिऑसफीच्या प्रचारार्थ जगांतील सर्व देशांत पुनः पुनः प्रवास केलेला आहे. दक्षिण अमेरिकेंतील देशांत फारसें थिऑसफीय कार्य अद्याप झालेलें नाहीं. त्या देशांत प्रथमतः दौरे काढून त्यांनीं त्या कार्याचें बीजारोपण केलें. १९०२ सालीं त्यांनीं प्रचारक म्हणून इटली देशांत आपल्या सार्वजनिक कार्यास सुरवात केली, व एकसारखी पन्नास वर्षें हें प्रचारकार्य जगभर केल्याबद्दल १९५२ सालीं इटलींत त्यांचा जाहीर रीतीनें सत्कार करण्यांत आला. ते चांगले लेखकही होते. त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांपैकीं The First Principles of Theosophy नांवाचा जो एक उत्कृष्ट ग्रंथ आहे त्याचें आठ भाषांत भाषांतर झालेलें आहे. सन १९२१ पासून १९२८ पर्यंत अखिल थिऑसफिकल सोसायटीचे ते उपाध्यक्ष होते. डॉ. ॲरंडेल हे थिऑसफिकल सोसायटीच्या अध्यक्षपदावर असतांना १९४५ सालीं निधन पावले. त्यानंतर मि. जिनराजदास यांची सोसायटीनें अध्यक्षस्थानीं निवड केली. त्यांची अध्यक्षीय कारकीर्द संपली तेव्हां त्यांचें वय ७७ होतें. म्हणून ते पुनः अध्यक्षपदासाठीं उमेदवार म्हणून उभे राहिले नाहींत अध्यात्म दृष्टयाही त्यांचा अधिकार मोठा होता. पुढें पुढें त्यांची प्रकृति चांगली नसे. तरीही प्रचारार्थ हिंडण्याचें कार्य ते करीत. अमेरिकेंत प्रचारकार्य करीत असतांनाच १९५३

सालीं म्हणजे वयाच्या ७८ व्या वर्षी त्यांस मृत्यु आला. हा मुलगा बारा वर्षांचा असतांना तो होतकरू आहे, त्याच्या हातून मोठें कार्य व्हावयाचें आहे असें ज्या अंतर्ज्ञानाच्या आधारावर मि. लेड-बीटर यांना वाटलें व ज्या अंतर्ज्ञानाच्या आधारावर हालअपेष्टा सोसून कित्येक विचित्र वाटणाऱ्या गोष्टी मि. लेडबीटर यांनीं केल्या, त्या अंतर्ज्ञानाचें प्रत्यंतर मि. जिनराजदास यांच्या भावी आयुष्यांत वरीलप्रमाणें आलें !

## श्री. जे. कृष्णमूर्ति

अशा प्रकारचें दुसरें उदाहरण प्रसिद्ध तत्त्वज्ञ श्री. जे. कृष्णमूर्ति यांचें आहे. त्यांचा जन्म १८९५ सालचा आहे. त्यांचे वडील मामलेदार होते. ते थिऑसफिस्ट असल्यामुळें पेन्शन घेतल्यानंतर ते आपल्या मुलांसह सन १९०९ मध्यें थिऑसफिकल सोसायटीचें मुख्य केंद्र जें अडचार तेथें रहावयास आले. थिऑसफीय पुढारी मि. लेडबीटर हेही कांहीं दिवस अगोदर-पासून तेथेंच रहात असत. त्याच सालीं म्हणजे कृष्णमूर्ति हे तेरा चौदा वर्षांचे असतांना सहजासहजीं कृष्णमूर्ति मि. लेडबीटर यांच्या दृष्टीस पडले. मि. लेडबीटर यांना अंतर्ज्ञानानें या मुलांत कांहीं विशेष आहे असें वाटलें. त्या वेळीं डॉ. बेझंट या थिऑ-सफिकल सोसायटीच्या अध्यक्ष होत्या; पण प्रचारकार्यार्थ परदेशीं हिंडत होत्या. मि. लेडबीटर यांनीं डॉ. बेझंट यांस या मुलाविषयीं पत्रें लिहिलीं. पुढें १९०९ च्या नवंबरांत डॉ. बेझंट या आपला दौरा संपवून अडचार येथें परत आल्या. त्या वेळीं मि. कृष्णमूर्ति यांस त्यांनीं प्रथम पाहिलें. त्यांनाही अंतर्ज्ञानानें या मुलांत कांहीं विशेष असल्याचें दिसलें. हा मुलगा होतकरू आहे, पुढें तो मोठा झाल्या-वर आगामी नवयुग काळांत जगाला मार्गदर्शन करील असें त्या दोघांनाही वाटलें.[1] वरवर पाहिल्यास या मुलामध्यें विशेष

१. हें अंतर्ज्ञान काय होतें त्याची माहिती How The World Teacher Comes (१९२६) या पुस्तकांत पृ. ७ ते १८ वर व The Work of the

( टीप पुढील पानावर चालू )

असें कांहीं वाटण्याजोगें नव्हतें. तो प्रकृतीनें अशक्त व किडकिडीत असून लाजाळू व बावळट दिसे. अड्यारजवळील एका शाळेंत तो शिकत होता, पण तेथें तो मंदबुद्धीचा म्हणून प्रसिद्ध असे.[१] डॉ. बेझंट व मि. लेडबीटर या दोघांचें म्हणणें असें होतें कीं जगांत एक कालखंड संपून लवकरच नवीन कालखंडास सुरवात व्हावयाची आहे व त्या वेळीं जगाला नवसंस्कृतीचा मार्ग दाखविण्याचें महत्त्वाचें कार्य पुढें कृष्णमूर्तींच्या हातून व्हावयाचें आहे.[२] कृष्णमूर्तींचा बाप हा डॉ. बेझंट यांचा अनुयायी होता. त्यांनीं त्याला बोलावून आणिलें व तुझा मुलगा पुढें नांवलौकिक-वान् होणार आहे, त्याचें शिक्षण मी पुरें करावें अशी माझी मनीषा आहे, मी त्याला उत्कृष्ट प्रकारचें शिक्षण देण्याची सोय करीन, त्यासाठीं पुष्कळ पैसे खर्च करीन, त्याला परदेशांतही पाठवीन, यासाठीं तूं मला मुलाचा पालक नेम अशी बाईंनीं बापाला विनंति केली. आपला मुलगा पुढें थोर होणार आहे हें

---

(टीप मागील पानावरून)

Ruler and the Teacher (अड्यार पँफ्लेट क्रमांक १३५) यांत पृ. ५ वर डॉ. बेझंट यांनीं दिलेली आहे. मि. लेडबीटर यांनीं १९०९ सालीं डॉ. बेझंट यांस दौऱ्यावर असतांना जीं पत्रें लिहिलीं ती १९३२ सालच्या थिऑसफिस्ट मासिकाच्या जून, जुलै, सप्टेंबर व ऑक्टोबर अंकांत प्रसिद्ध झालेलीं असून त्यांतील कांहीं उतारें जिनराजदासकृत The Occult Investigations या पुस्तकांत पृ. १२५–१२७ वर दिलेलें आहेत.

१. Mrs. Besant and the Alcyone Case या पुस्तकांत पृ. ३३ वर Krishnamurti had been known at mylapore Boys' School as a dull boy असें म्हटलेलें आहे.

२. डॉ. बेझंट ह्या श्री. कृष्णमूर्तींना Vehicle of the World Teacher असें म्हणत. The World Teacher किंवा जगद्गुरू म्हणून एक महाज्ञानी सूत्रचालक जगाच्या उत्क्रान्तीच्या पाठीमागें आहे व कृष्ण-मूर्ति हे त्याच्या ज्ञानाचें 'वाहन' किंवा Vehicle होतील, त्यांचे संदेश-वाहक अथवा प्रेषित होतील असें डॉ. बेझंट याचें म्हणणें होतें.

ऐकून बापाला आनंद झाला, व त्यानें कायदेशीर कागदपत्र लिहून देऊन बाईंना मुलाचा पालक नेमलें. बाईंनीं लगेच मुलाचें शिक्षण स्वतःच्या हातांत घेतलें. पण थोडे दिवस गेल्यावर बाईच्या हितशत्रूंनीं विशेषतः अमेरिकेंतल्या हितशत्रूंनीं बापाला बाईच्या विरुद्ध चिथावलें व थिऑसफिकल सोसायटीवर चिखल फेकण्यासाठीं 'मि. लेडबीटर हे अनीतिमान् आहेत, त्यांच्या संगतींत तुम्ही माझा मुलगा ठेवला असून तो बिघडण्याचा संभव आहे, तेव्हां तुम्ही माझा मुलगा माझ्या स्वाधीन करा' अशा अर्थाची कायदेशीर नोटीस बापाकडून बाईंना देवविली. डॉ. बेझंट यांनीं त्या नोटिशीस भीक घातली नाहीं. तेव्हां १९१२ सालीं बापानें हें प्रकरण मद्रासच्या हायकोर्टांत नेलें. सामान्य लोकांना हें प्रकरण काय आहे तें बिलकुल उमजेना.[1] पांसष्ट वर्षांच्या युरोपियन बाईनें एका मद्रासी ब्राह्मणाचा मुलगा शिक्षणार्थ आपल्या ताब्यांत घ्यावा व बाप मुलगा परत मागत असतांना त्याला हटवादीपणानें तो न देतां त्याला कोर्टाचा रस्ता दाखवावा, हें जनतेला विचित्र दिसलें. या मुलाचें शिक्षण नीट न झालें, तर डॉ. बेझंट यांचें काय जातें? असा एक प्रश्न जनतेच्या मनांत येई. ब्राह्मणाचा मुलगा बापापासून हिसकून घ्यावा व तो त्याला परत देऊं नये यांत बाईंचें

---

१ आपला मुलगा आपणांला परत मिळावा अशा प्रामाणिक हेतूनें ही फिर्याद केलेली नव्हती. फिर्यादीचे वकील श्री. सी. पी. रामस्वामी ऐयर होते. त्यांनीं बरेच वर्षांनंतर सार्वजनिक रीतीनें सांगितलें कीं मी त्या वेळीं तरुण वकील होतो व या फिर्यादीनें थिऑसफीचा पाडाव होणार आहे अशी मला घमेंड वाटत होती आणि या फिर्यादीच्या बुडाशीं फक्त एक हिंदी माणूस असून पुष्कळ अमेरिकन लोक होते. (पहा अड्यार पॅम्फ्लेट नं. १८६. त्यांत सर सी. पी. रामस्वामी म्हणतात : I fancied, I had made a great hit and that I had brought about the collapse of Theosophy–a young man in a hurry generally thinks so. I may tell you now that my clients were many Americans and only one Indian.

कांहीं कृष्ण कारस्थान आहे, असाहि लोकांना संशय वाटला. पण बाईंच्या पाठीशीं अंतर्ज्ञानाचा आधार होता. त्यांनीं लोकनिंदेचे प्रहार सोसले, पण नमतें घेतलें नाहीं. प्रथम हायकोर्टानें बाईंच्या विरुद्ध निकाल दिला. ज्या बापानें कायदेशीर कागद बाईंना करून दिला होता त्या बापाला तो कागद रद्द करून मुलगा परत मागण्याचा अधिकार आहे, मुलाच्या शिक्षणावर बाईंनीं पैसे खर्च केले असले तर त्यांनीं बापावर दिवाणी दावा देऊन ते पैसे वसूल करून घ्यावे, पण बापाला मुलगा परत मिळाला पाहिजे असें कोर्टानें ठरविलें. बाईंनीं या निकालावर हायकोर्टाच्या अपिलेटबाजूकडे अपील केलें. तेथेंही बाई हरल्या. पुढें बाईंनीं इंग्लंडांत प्रीव्ही कौन्सिलकडे अपील केलें. प्रीव्ही कौन्सिल म्हणूं लागलें कीं मुलगा हा कांहीं निर्जीव पदार्थ नाहीं कीं जो मालकी हक्कास्तव एकाच्या ताब्यांतून काढून दुसऱ्याच्या हवालीं करतां येईल. मुलावर कोणाची कायदेशीर मालकी आहे या प्रश्नापेक्षां मुलाचें हित कशांत आहे हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे; त्यासाठीं आम्हांसमोर मुलाची बाजू आली पाहिजे. प्रीव्ही कौन्सिलसमोर ही फिर्याद चालल्यावर कोर्टाच्या लक्षांत आलें कीं बापाच्या ताब्यांत मुलाला परत दिल्यास मुलाचें नुकसान होणार आहे; तेव्हां बापाला मुलावर जो हक्क दिलेला असतो तो मुलाच्या हितासाठीं असतो असें कोर्टानें ठरवून १९१४ च्या मे महिन्यांत डॉ. बेझंट यांच्या बाजूचा निकाल दिला व कृष्णमूर्तींचें शिक्षण बाईंना आपल्या मतानुसार पुरें करतां आलें.[1]

---

१ अंतर्ज्ञान ही गोष्ट कोर्टासमोर सिद्ध करून दाखवितां येणें शक्य नसतें. ती कोर्टांत आणली तर त्यांत लबाडी आहे असें म्हणण्यास वाव असतो. म्हणून बाईंना त्याबाबत मूग गिळून गप्प रहावें लागलें. निमूटपणें लोकनिंदा सोसण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हतें. कोर्टाचा अखेरचा निकाल होऊन पुष्कळ वर्षें जेव्हां लोटलीं तेव्हां हें प्रक्षुब्ध वातावरण निवळलें. त्यानंतर बाईंनीं आपल्या अंतर्ज्ञानाचो कांहीं माहिती आपल्या पुस्तकांत जगासमोर प्रसिद्धपणें मांडली. ती कोठें सांपडेल याचे उल्लेख आम्ही वर दिलेले आहेतच.

लहानपणीं बावळट वाटणारा हा मुलगा अलीकडे हळूहळू जगप्रसिद्ध होत आहे; एक युग मोडत असून दुसऱ्या युगाची सुरवात सर्व जगभर झालेली दिसत आहे आणि मि. कृष्णमूर्ति हे आपला एक अनन्यसाधारण असा संदेश नव्या जगाला सांगत देशोदेशीं फिरत आहेत. हळूहळू त्यांचा प्रभाव सर्वत्र पडत आहे. उदाहरणार्थ अल्डूस हक्स्ले या जगप्रसिद्ध लेखकानें त्यांच्या एका पुस्तकालाप्रस्तावना लिहून त्यांच्या विचारांचा पुरस्कार केला आहे. नवीन युगला मार्गदर्शन करतील असे कांहीं मौलिक विचार त्यांच्या संदेशांत आहेत. अशा रीतीनें डॉक्टर बेझंट व लेडबीटर यांचें अंतर्ज्ञान खरें ठरण्याची सुरवात आज आपल्या नजरेसमोर झाली आहे. त्या अंतज्ञानासाठीं त्यांनीं धैर्यानें लोकक्षोभ सोसला व चिकाटीनें कोर्टांतील भांडणें भांडलीं याबद्दल त्यांना धन्यवाद मिळणें जरूर आहे.[१]

## डॉ. ॲरंडेल

डॉ. जार्ज ॲरंडेल हे डॉ. बेझंट यांच्यानंतर थिऑसफिकल सोसायटीचे दहा अकरा वर्षें अध्यक्ष होते. अगदीं लहान असतांना ते थिऑसफिकल सोसायटीच्या संस्थापक मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्याकडे वारंवार जात असत. ॲरंडेल हें आडनांव त्यांच्या आईच्या माहेरचें होतें. डॉ. ॲरंडेल ह्यांचा जन्म झाल्यावर लगेच त्यांची आई वारली व आईची बहीण फ्रान्सेस्का ॲरंडेल यांनीं त्या मुलाचें पुत्रवत् पालन व संगोपन केलें. मुलाचें आडनांवही त्यांनींच ॲरंडेल असें ठेवलें. फ्रान्सेस्का ॲरंडेल व त्यांची आई यांना थिऑसफीची गोडी लागल्यामुळें त्या १८८१ च्या सुमारास थिऑसफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या. त्या मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांजकडे वारंवार भेटावयाला जात असत, व त्यावेळीं ह्या तीन चार वर्षांच्या लहान मुलास

१ डॉ. बेझंट–लेडबीटर यांच्या म्हणण्याप्रमाणें मि. कृष्णमूर्ति यांचें कार्य भविष्यकाळीं अधिक प्रभावी होणार आहे. पुढें काय होईल तें पुढें दिसेल. पण आज त्या दोघांच्या म्हणण्याचें प्रत्यंतर येण्याची सुरवात झाली आहे ही गोष्ट कोणालाही नाकारतां येणार नाहीं.

बरोबर नेत. कधीं कधीं मॅडम् ब्लॅव्हॅट्स्की ह्या त्यांच्या घरीं राहून त्यांचा पाहुणचारही घेत. त्यामुळें हा मुलगा तीन चार वर्षांचा असल्यापासून मॅडम ब्लॅव्हॅट्स्कींच्या ओळखीचा झाला होता. त्याला बागेंत फिरायास नेणें, गंमत म्हणून त्याला प्राणिसंग्रहालयांतले वाघ–सिंह दाखवणें वगैरे गोष्टी त्या करीत. त्यांनीं खेळकरपणानें त्याला त्याच्या सहाव्या वाढदिवशीं एक विनोदी पत्र लिहिलें आहे. त्या लहान मुलाला मौज वाटावी म्हणून वर एक चित्र असलेला कागद त्यांनीं मुद्दाम निवडून घेतला आणि त्याच्यावर तें पत्र लिहिलें. त्यांतला मजकूर असा :–

नेक नामदार राजमान्य राजश्री जॉर्जी शिष्य यास अनेक आशीर्वाद. तुला नवें वर्ष आनंदाचें जावो. धार्मिक पण थंडीनें गारठलेला असा जो रशिया नांवाचा देश आहे, तेथून ही खालीं सही करणारी बाई आलेली आहे असें लोक समजतात. तेथून एक खाऊचा पुडा मी मागविलेला आहे. तो पुडा हातीं आला म्हणजे तुला मिळेल. या तुझ्या म्हाताऱ्या मैत्रिणीच्या मनांतील अभिप्राय पुढें जेव्हां तुला उमजेल तेव्हां तूं खरोखरींच शिष्य होणार आहेस.

तुझी एच. पी. ब्लॅव्हॅट्स्की.[1]

---

१ या पत्राचा फोटो जिनराजदासकृत The Golden Book of the Theosophical Society या पुस्तकांत पृ.२०२वर व थिऑसफिस्ट मासिक जून १९५० पृ. १६७ वर दिलेला आहे. तो इंग्रजी मजकूर पुढीलप्रमाणें आहे :

To Georges chela Esq.

Happy new year to the most Honourable Georgy Esq.

A box of sweets is forthcoming from Russia, a cold and pious country where the undersigned is supposed to have evoluted from. When it arrives, you shall have it, and when you understand what your loving old friend means - - you shall indeed be a chela.

Yours respectfully,
H. P. Blavatsky.

हें पत्र गंमत म्हणून लिहिलेलें असलें तरी हा पांचसहा वर्षांचा मुलगा जीवन्मुक्त गुरूचा पुढें शिष्य होईल असें विधान त्यांत मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं केलेलें आहे. हा मुलगा हळूहळू थिऑसफीशीं समरस होऊन १८९५ सालीं म्हणजे वयाच्या सतराव्या वर्षीं थिऑसफिकल सोसायटीचा सभासद झाला. १९०० सालीं केंब्रिज विश्वविद्यालयाचा एम. ए. झाला. १९०३ सालीं डॉ. बेझंट यांनीं काशी येथें स्थापलेल्या सेंट्रल हिंदु कॉलेजचा इतिहासाचा प्राध्यापक म्हणून हिंदुस्थानांत आला. तेथें पुढें प्रिन्सिपल झाला. १९१७सालीं टिळक-बेझंट यांच्या होमरूल चळवळीशीं समरस होऊन सरकारच्या अटकेंत गेला. थिऑसफिकल सोसायटीचीं मोठमोठीं व जबाबदारीचीं कामें करून शेवटीं डॉ. बेझंट यांच्या निधनोत्तर त्यांच्या रिकाम्या झालेल्या अध्यक्षपदावर विराजमान झाला. अध्यात्म मार्गावरही त्याची प्रगति होऊन जीवन्मुक्त गुरूचा शिष्यही झाला. अशा रीतीनें मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनीं तो सहा वर्षांचा असतांना केलेलें विधान सत्यसृष्टींत उतरलें !

## श्री. रुक्मिणी देवी

डॉ. ॲरंडेल यांच्या पत्नी रुक्मिणी देवी यांची निवडही अंतर्ज्ञानाच्या आधारावर झालेली आहे. त्यांचा जन्म १९०५ सालीं झाला व लहानपणापासून त्या अडयार ( थिऑसफिकल सोसाटीचें आद्यपीठ) येथें रहात असल्यामुळें थिऑसफीय पुढारी डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांची व रुक्मिणीदेवींची ओळख लहानपणींच झाली. इ. स. १९२५ सालीं हॉलंड देशांतील एका सार्वजनिक व्याख्यानांत डॉ. बेझंट यांनीं रुक्मिणीदेवींचें वर्णन केलेलें आहे. त्या वर्णनांत या मुलीला अगदीं बालपणीं आपल्या जीवन्मुक्त सद्गुरूकडून बोलाविणें आलेलें आहे, मी करीत असलेल्या कामांपैकीं कांहीं कार्याचा भार ती पुढें अंगावर घेईल, देहदृष्टया ती लहान असली तरी ज्ञानदृष्टया ती वडील आहे, तिच्या अंगांत उत्कृष्ट निर्धारशक्ति असून अंतरंगाच्या भूमिकेवर आम्ही तिला 'निर्धारकन्यका'

या नांवानें संबोधीत असतों अशा प्रकारचीं विधानें केलेलीं आहेत.[१]

आज रुक्मिणी देवी थिऑसफिकल सोसायटीच्या एक पुढारी आहेत. अध्यात्मशास्त्रांत जी कलेची बाजू आहे तींत त्या प्रवीण आहेत. त्यांना उत्कृष्ट नाट्य करतां येतें; पण त्या नाट्याबरोबरच त्या एक स्वतःचा संदेश जनतेला ऐकवीत असतात. किंबहुना त्या संदेशासाठींच त्या नाट्य करतात असें म्हटलें तर चालेल. नटासारख्या त्या नुसत्या नाट्यप्रवीण नाहींत. जगांतील प्रश्नांकडे व मानवी प्रगतीकडे त्या एका विशेष दृष्टीनें पहातात व ती दृष्टि जनतेला आणून देण्यासाठीं आपल्या कलेचा साधन म्हणून उपयोग करतात. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग व कर्ममार्ग हे जसे मानवी प्रगतीचे मार्ग आहेत, त्या मार्गावर माणसाची आध्यात्मिक प्रगति होऊन तो जसा अंतीं ईश्वरासमान बनतो, तसा कला हीही एक आध्यात्मिक प्रगतीचा मार्ग आहे. हल्लीं लोक कला हें करमणुकीचें साधन आहे असें समजून कलेंत फक्त स्वतःची कमरणूक करून घेतात. करमणुकीचा भावनांशीं निकट संबंध आहे. नाट्य, गायन वगैरेसारख्या कोणत्याही करमणुकीच्या मागें मनुष्य लागला म्हणजे त्याच्या भावना उत्तेजित होतात व त्या जर शुद्ध नसल्या व अनावर झाल्या तर तो माणूस व्यसनी बनण्याचें भय असतें; अर्थात् कलेच्या उपासनेंत दंग असणारा माणूस कधीं कधीं व्यसनाधीन झालेला आढळतो. ज्या काळांत कलेला प्राधान्य मिळालेलें आहे त्या काळांत कधीं कधीं समाज

१ पहा थिऑसफिस्ट मासिक अंक नवंबर १९२५ पृ. १५२ वरील डॉ. बेझंट यांच्या ११ ऑगष्ट १९२५ रोजीं झालेल्या ऑमेन् स्टार कॉंग्रेसच्या व्याख्यानाचा रिपोर्ट. डॉ. बेझंट म्हणतात : This Indian girl of a glorious past, who hearing the call of her Master very, very early in life, .... will take up a large part of the work there I have been carrying on for years. Young in body, yet she is old in wisdom and in will-power. "Child of the indomitable will" is her welcome in the higher worlds.

व्यसनांच्या आहारीं गेलेला सांपडतो. कलेच्या कडे नुसतें करमणुकीच्या दृष्टीनें पाहिल्यामुळें हे दुष्परिणाम होतात असें रुक्मिणीदेवींचें म्हणणें आहे. कला हा ईश्वराकडे जाण्याचा एक अध्यात्म प्रगतीचा मार्ग आहे. कलेनें मनाला करमणूक होत असली, तरी करमणूक हें कलेचें मुख्य साध्य नाहीं. ज्ञानमार्ग-भक्तिमार्ग-कर्ममार्ग या मार्गांनीं जाण्याऱ्याला जसा ध्येयवाद आवश्यक आहे, चित्तशुद्धि आवश्यक आहे. तद्वत् कलामार्गानें जाणाऱ्यालाही या गोष्टी आवश्यक आहेत. हें माणसानें ओळखलें म्हणजे कलामार्ग शुद्धस्वरूप धारण करतो. कलात्मकतेनें माणसाला अधिक अधिक प्रमाणांत सौंदर्य समजतें, त्याची रसिकता, त्याची संस्कारक्षमता, त्याची सहानुभूति, त्याच्या वृत्तीचा हळूवारपणा, यांची वाढ होते. त्यानें तो अधिकाधिक सुसंस्कृत होऊन अध्यात्म मार्गावर प्रगति करतो. भावी युगांतही कलेची दृष्टि जगाला आली पाहिजे, नवसमाजांत कलेला उच्चस्थान मिळालें पाहिजे, व कलेच्या असल्या वातावरणांत माणसाला ठेवून त्याला सुसंस्कृत केलें पाहिजे असा रुक्मिणीदेवींचा दृष्टिकोन आहे. आपल्या व्याख्यानांत देशोदेशीं त्या हा संदेश सांगतात. त्यांनीं अड्यार येथें कित्येक कलासंस्था व शिक्षणसंस्था या कार्यार्थ स्थापून चालविल्या आह्रेत, आणि हिंदुस्थानच्या राष्ट्रपतींनीं या संदेशाच्या प्रतिनिधी म्हणून त्यांना दिल्लीच्या राज्यसभेचें सभासदत्व दिलेलें आहे.

## प्रकरण ८ वें

# कित्येक संकीर्ण गोष्टी

मागील प्रकरणांत ज्या गोष्टी समाविष्ट करतां आलेल्या नाहींत त्या ह्या प्रकरणांत देण्याचा विचार आहे. हें पुस्तक अजमासाबाहेर वाढू नये यासाठीं त्या गोष्टी अमदीं संक्षिप्त रीतीनें वाचकांसमोर ठेवणें अवश्य आहे.

डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांनीं The Man: Whence, How and Whither या नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत शेवटीं The Beginnings of the Sixth Root-Race नांवाचें एक प्रकरण[1] मि. लेडबीटर यांनीं लिहिलें आहे. या प्रकरणांत भविष्यकाळीं होणाऱ्या कित्येक गोष्टींचें अंतर्ज्ञानानें मिळविलेलें वर्णन समाविष्ट आहे. त्या वर्णनांत एका भावी वसाहतीबद्दल मि. लेडबीटर लिहितात, कीं आपण जसें रोज वर्तमानपत्र घेऊन वाचतों, तसें या वसाहतींतील भविष्यकालीन माणसें करणार नाहींत. प्रत्येकाच्या घरांत एक पेटी असेल. त्यांत यांत्रिक योजना अशी असेल कीं मधून मधून त्यांत बातम्या छापलेलें कागदाचे तुकडे आयते पडावे. तीं माणसें ही पेटी उघडतील आणि त्यांतील तुकड्यांवरील बातम्या वाचून जगांत काय चाललें आहे तें समजून घेतील.[2]

---

१. वरील संशोधनाबद्दलची अधिक माहिती मागें प्रकरण ६ पृ. वर दिली आहे ती पहा.

२. पहा Man, Whence, How and Whither (१९१३) पृ. ४३० 'The daily newspaper has disappeared....In each house there is a machine which is a kind of combination of a

( टीप पुढील पानावर चालू )

## टेलप्रिंटर व अणुबाँब

सन १९१३ सालीं हें वर्णन प्रसिद्ध झालें. त्यावेळीं ही गोष्ट कोणालाही शक्य व विश्वसनीय वाटण्यासारखी नव्हती. पण अलीकडे अशा तऱ्हेच्या यांत्रिक पेट्या खरोखरींच तयार झालेल्या आहेत! पुष्कळ वर्तमानपत्रांच्या ऑफिसांत त्या सांपडतात. मध्यवर्ती ऑफिसशीं प्रत्येक पेटीचा संबंध असतो. तें ऑफिस ज्या ज्या बातम्या विजेनें पाठवितें त्या साऱ्या प्रत्येक पेटींतील कागदावर आपोआप छापल्या जातात व पेटींत ते कागद रहातात. या यंत्रास टेलिप्रिंटर (Teleprinter) असें नांव आहे.

डॉ. ॲनी बेझंट यांचें Theosophy and the World Problems नांवाचें एक पुस्तक आहे. त्यांत त्यांचीं १९२१ सालचीं व्याख्यानें आहेत. त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर आहे: जगांतील शास्त्रज्ञ आज एका शोधाच्या अगदीं नजीक आले आहेत. द्रव्याचा परमाणु कसा फोडावा, त्या परमाणूला एकत्र धरून ठेवणारी शक्ति कशी सुटी करावी, या उद्योगांत ते मग्न आहेत. हा प्रश्न त्यांना सोडवतां आल्यास एवढी प्रचंड शक्ति माणसाच्या हस्तगत होईल कीं तिच्या साहाय्यानें एका व्यक्तीला कोणतेंही मोठें शहर बेचिराख करून त्यांतील प्रत्येक मनुष्याला यमसदनास पाठवितां येईल.[1]

---

(टीप मागील पानावरून)

telephone and recording tape machine....It is so arranged that anything written or drawn upon a specially prepared plate and put into the box of the large machine at the central office, will reproduce itself automatically upon slips which fall into the box of the machine in each of the houses.

१. The Scientific World is on the verge of discovery.... of how to break up the atom, how to liberate the forces which hold the atom together. If they succeed, they will be able to liberate forces by which a single person can loosen energy which will lay the whole of a huge city in ruins and kill every being in it. डॉ. बेझंट यांनीं इतर ठिकाणींही हा विचार १९१९ सालीं प्रकट केला असल्याचा उल्लेख थिऑसफिस्ट मासिक अंक सप्टेंबर १९४५ पृ. २३६ वर आहे.

परमाणूच्या आंत इतकी अवाढव्य शक्ति अस्तित्वांत आहे याचें प्रत्यंतर १९४५ सालीं जेव्हां हिरोशिमा व नागासाकी येथें अणुबाँब टाकण्यांत आले तेव्हां सर्व जगाला मिळालें. आतां त्या बाँबमध्यें सुधारणा होऊन हैड्रोजन बाँब तयार करण्यांत आला आहे आणि त्याची जी चांचणी झाली तींत त्याची संहारक शक्तिपूर्वीच्या अणुबाँबपेक्षां अनेक पटींनीं अधिक असल्याचें सिद्ध झालें आहे.

## सूक्ष्म कोष

माणसाला जसा जडदेह असतो तसे त्याला अनेक सूक्ष्म कोष किंवा सूक्ष्म देह असतात अशी हिंदुधर्माची शिकवण आहे. सूक्ष्म-देहाविषयीं अनेकांनीं अनेक कल्पना लढविल्या आहेत. कांहीं ग्रंथांत माणसाच्या हृदयांत जो आत्मा असतो तो अंगठ्याच्या आकाराएवढा (अंगुष्ठमात्र) असतो असें लिहिलेलें असल्यामुळें माणसाचा सूक्ष्मदेह अंगठ्याएवढा असतो असा कित्येक विद्वानांनीं अर्थ केला आहे. कांहीं ग्रंथांत आत्मा हा सुईच्या टोंकाएवढा (आराग्रमात्र) किंवा केंसाच्या अग्राचे शेंकडो तुकडे केल्यास त्या तुकड्याएवढा असतो असें वर्णन असल्यामुळें सूक्ष्मदेह हा अगदीं बारीक असतो असें कांहीं पंडितांनीं मत दिलें आहे.[1] खरोखरी सूक्ष्मकोष हे अस्तित्वांतच नसतात; त्या नुसत्या सोयीस्कर कल्पना आहेत आणि थिऑसफिस्टांनीं ग्रंथांचा भलता अर्थ लावून सूक्ष्म-कोषांचीं चुकीचीं वर्णनें दिलीं आहेत असेंही कांहीं विद्वानांनीं म्हटलें आहे.[2]

---

१ अंगुष्ठमात्रः पुरुषोन्तरात्मा सदा जनानां हृदये सन्निविष्टः।
—कठोपनिषद् २, ७, १७

आराग्रमात्रो ह्यवरोऽपि दृष्टः
बालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च ।
भागो जीवः स विज्ञेयः स चानंत्याय कल्पते ।।
—श्वेताश्वतरोपनिषद् ५, ८, ९

२ प्रसिद्ध तत्त्वज्ञ व प्राध्यापक श्री. रामभाऊ द. रानडे यांनीं आपल्या A Constructive Survey of Upanishadic Philosophy या पुस्तकांत

(टीप पुढील पानावर चालू)

या कोषांविषयीं थिऑसफिकल सोसायटींत योगसिद्धीच्या साहाय्यानें पद्धतशीर रीतीनें संशोधन करण्यांत आलेलें आहे. कोष अनेक असतात, ते सुईच्या अग्रासारखे किंवा आंगठ्याच्या आकारा-एवढे असत नाहींत, ते काल्पनिक नसून खरोखरच अस्तित्वांत आहेत असें थिऑसफीय संशोधन सांगतें. हे कोष विरळ द्रव्याचे असतात, आणि माणसाच्या दृश्य देहाला व्यापून दृश्यदेहाभोवतीं त्यांचें वेष्टन असतें असें संशोधकांस आढळलेलें आहे. या कोषांचीं तपशीलवार वर्णनें थिऑसफीय वाङ्मयांत, विशेषतः डॉ. बेझंटकृत The Ancient Wisdom या पुस्तकांत आहेत. मि. लेडबीटर यांच्या The Man Visible and Invisible या पुस्तकांतही विस्तृत माहिती असून ते कोष कसे दिसतात याचीं पुष्कळ चित्रेंही दिलेलीं आहेत.

या संशोधनाचाही पडताळा आला आहे. डॉ. डब्ल्यू. जे. किल्नर यांनीं दोन कांचामध्यें डायसायनीन नांवाचें द्रव्य घालून भिंगें तयार केलीं आहेत. त्यांतून माणसाकडे पाहिलें म्हणजे त्याच्या देहाभोवतीं ढगासारखी आकृति पसरलेली प्रत्यक्ष दिसते. या आकृतींत घट्ट-विरळ असे द्रव्याचे कांहीं थरही दिसतात. किल्नर

---

(टीप मागील पानावरून)

थिऑसफीवर टीका करून हे सूक्ष्मकोष अस्तित्वांतच नाहींत असें प्रतिपादिलें आहे. ते लिहितात ( पृ. १४३ ) : The general mistake of the theory consists in taking words for things. These bodies are nothing more than mere allegorical representations of certain psychological conceptions. श्री. रानडे यांनीं शंकराचार्यांचें मतही आपल्यासारखेंच असल्याचें तेथें नमूद केलें आहे; पण श्री. रानडे यांचें हें म्हणणें चुकीचें दिसतें. कारण शंकराचार्यांनीं गौडपादकारिकांवरील भाष्यांत (३, ११ ) तरवारीला जसें म्यान असतें तसे हे कोष असतात असें सांगितलें आहे. (कोशाः अस्यादेरिव उत्तरोत्तरस्य अपेक्षया बहिर्भावात पूर्वपूर्वस्य व्याख्याताः विस्पष्टम् आख्याताः तैत्तिरीयके । )

यांनीं आपल्या पुस्तकांत[1] निरनिराळ्या स्थितींत निरनिराळ्या माणसांसभोवतीं ढगासारख्या दिसणाऱ्या अठ्ठावीस आकृति दिल्या आहेत. माणसाच्या देहास व्यापणारे व त्याच्या देहासभोंवार पसरलेले सूक्ष्म कोष अस्तित्वांत असतात या थिऑसफीय विधानाच्या प्रत्यंतरास ही अशी सुरवात झालेली आहे.

आणखी एक प्रत्यंतर सांगून हें प्रकरण पुरें करूं. थिऑसफिकल संस्थापकद्वयांपैकीं कर्नल ऑलकॉट हे एक होते. त्यांना स्वतःचें अंतर्ज्ञान नसे. पण अंतर्ज्ञानी व्यक्तींचा व त्यांचा निकट संबंध असल्यामुळें त्यांना अंतर्ज्ञान संपादन करण्याची आयती संधि मिळे. त्यांनीं लिहिलेलें आहे कीं, साताचा आकडा, आणि मी व थिऑसफिकल सोसायटीचा इतिहास या त्रयीचा निकटचा ऋणानुबंध आहे. अर्थात् साताच्या आंकड्याशीं संबंध असलेल्या वेळींच मला मृत्यु येईल यांत संशय नाहीं. ही गोष्ट पुढें पंधरा वर्षांनीं खरी झाली, आणि कर्नल ऑलकॉट हे अडचार येथें १९०७

---

१. पुस्तकाचें नांव The Human Atmosphere or the Aura made Visible by the aid of Chemical Screens (by W. J. Kilner M. B. M. R.C. P. Late electrician St. Thomas Hospital London) असें आहे. या पुस्तकाबरोबर भिंगेंही पूर्वीं विकत मिळत असत. आम्हां स्वतःला या भिंगांचा उपयोग करून देहाभोवतालच्या ढगांसारख्या आकृति प्रत्यक्ष पहाण्याची संधि मिळालेली नाहीं. कित्येक वर्षांमागें हें पुस्तक प्रथम प्रसिद्ध झालें तेव्हां किल्नर यांनीं विलायतेंत अनेक वर्तमान-पत्रांच्या बातमीदारांस व इतरांस त्या वेळीं प्रयोग दाखविले व त्यांस त्या आकृति पहातां आल्या अशी हकीकत प्रसिद्ध झालेली आहे. (पहा थिऑस-फिस्ट मासिक जुलै १९११ चा अंक पृ. ४८१–४८२ सप्टेंबर १९११ अंक पृ. ८००, ऑगस्ट १९१३ अंक पृ. ७१२-७२०)

सालच्या फेब्रुवारीच्या १७ व्या तारखेस सकाळीं ७ वाजून १७ मिनिटांनीं निवर्तले.[१] !!

१ कर्नल ऑलकॉट म्हणतात: My own death, when it comes, will no doubt occur on a day that will accentuate the fatefulness of number seven in the history of the Society and its founders. हें विधान थिऑसफिस्ट मासिकाच्या १८९२ सालच्या मार्च महिन्याच्या अंकांत त्यांनीं केलेलें आहे. या गोष्टीची माहिती त्याच मासिकाच्या १९३१ च्या मार्चच्या अंकांत पृ. ४१५ वर दिलेली आढळेल.

## प्रकरण ९ वें

# जगांतील धर्म व नवयुग

आज धर्माची नवीन मांडणी करणें अवश्य झालें आहे. धर्माच्या क्षेत्रांतील गोष्टी अदृश्य असल्यामुळें नवी मांडणी करण्यासाठीं थिऑसफीच्या चळवळींनें अदृश्य गोष्टींचें संशोधन केलेलें आहे. हें संशोधन खरें अत एव श्रद्धेय आहे कीं त्यांत नुसत्या गप्पा व कविकल्पना आहेत या प्रश्नाचें उत्तर आपण शोधीत आहों. अदृश्य सृष्टींतील संशोधनाचा पडताळा सांपडणें शक्य नसतें. उदाहरणार्थ, थिऑसफीय संशोधकांचें असें म्हणणें आहे कीं मरणोत्तर माणसाच्या वासनादेहाची एक नवीन प्रकारची रचना होत असते. ह्या म्हणण्याचा पडताळा प्राकृत माणसाला मिळणें शक्य नाहीं. कारण माणसाचा वासनादेह व त्याची नवी रचना या दोन्ही गोष्टी त्याला दिसत नाहींत. जर अदृश्य सृष्टींतील गोष्टींचा पडताळा त्याला मिळत नसेल तर त्या गोष्टी खऱ्या आहेत कीं नाहींत हें त्याला कसें ठरवितां येणार?

समजा, एका गांवाच्या मधून नदी जात असल्यामुळें त्या गांवाचे दोन विभाग पडले आहेत, व गांवाचा अर्धा भाग नदीच्या अलीकडे आहे व अर्धा नदीच्या पलीकडे आहे. समजा या सबंध गांवांतील रस्ते, चौक, घरें, मैदानें, शाळा, नाटकगृहें यांची सविस्तर माहिती आपणांला हवी आहे, ती मिळविण्यासाठीं आपण एका माणसाची नेमणूक केली आहे, व त्या माणसानें नदीच्या अलीकडे व पलीकडे पुन:पुन्हां खेपा घालून व सबंध गांवाची तपासणी करून रस्त्यांची लांबीरुंदी, चौकांची रचना, घरें, शाळा, वगैरेंची संख्या, मांडणी व हवी असलेली इतर तपशीलवार माहिती आपणांस सादर केली आहे. ही माहिती खरी आहे कीं खोटी आहे

असा प्रश्न पडल्यास आपण स्वतः त्या गांवांत जाऊन किंवा दुसऱ्या एकाद्या माणसास त्या गांवांत पाठवून आपणांस त्या माणसानें दिलेल्या माहितीचा पडताळा पहातां येईल. समजा आपण त्या गांवांत गेलों, आणि नदीच्या अलीकडचा भाग बारकाईनें पाहिला, आणि त्या माहितीचा पुरा पडताळा आपणांला मिळाला; तर ती माहिती खरी आहे असें आपणांला कबूल करावें लागेल. समजा नदीच्या अलीकडच्या भागाचा असा पडताळा आपणांला मिळाला आहे, पण नदीला पूर आल्यामुळें नदीपलीकडे जाऊन पलीकडल्या भागाची पहाणी करणें अशक्य झालें आहे. तर त्या माणसानें नदीपलीकडील भागाची जी माहिती दिली असेल, तिचें प्रत्यंतर आपणांला प्रत्यक्षपणें घेतां येणार नाहीं; पण ज्या माणसानें ज्या बुद्धिमत्तेनें, ज्या कसोशीनें, ज्या दक्षतेनें नदीअलीकडील भागाची माहिती मिळविली, व ज्या मोजणीच्या सांखळ्यांनीं मोजमापें घेतलीं, त्याच माणसानें त्याच प्रकारें व त्याच साधनांनीं नदी-पलीकडील गांवाचीही पाहणी केली असल्यामुळें, नदीअली-कडील भागाचें प्रत्यंतर मिळून ती माहिती जर आपण खरी ठरविली, तर पलीकडील भागाचें प्रत्यंतर न मिळालें तरीही ती माहिती खरी आहे असें आपणांस म्हणावें लागेल. नदीच्या अली-कडला भाग व पलीकडला भाग यांची पहाणी म्हणजे एकाच पहाणीचे दोन भाग आहेत; त्याच माणसानें, त्याच बुद्धिमत्तेनें, व त्याच साधनांनीं सगळी पहाणी केलेली आहे; तेव्हां त्यांतील अर्ध्या भागाचा पडताळा आपणांला मिळाल्यामुळें ती पहाणी जर आपण खरी ठरविली, तर दुसऱ्या अर्ध्या भागाची पहाणीही खरी असली पाहिजे असें म्हणणें सयुक्तिक होईल.

## संशोधनाचा खरेपणा व महत्त्व

अन्य उपमेनें सांगावयाचें झाल्यास दृश्य सृष्टीच्या सरहद्दीपलीकडे अदृश्य सृष्टीचा प्रांत आहे. थिऑसफीमध्यें (आणि धर्मामध्येंही) ह्या प्रांतांतील गोष्टींचें विवेचन येत असतें. सरहद्दीच्या अलीकडचा

जो दृश्यसृष्टीचा प्रांत, त्यांतील संशोधन आज थिऑसफी करीत नाहीं. भौतिक शास्त्रज्ञांचें तें काम आहे. पण सरहद्दीच्या पलीकडे असलेल्या अदृश्य गोष्टींचें संशोधन करतांना सरहद्दीच्या जरा अलीकडे असलेल्या दृश्य क्षेत्रांतील कित्येक गोष्टी थिऑसफीय संशोधकांना अगोदर समजल्या होत्या, व त्यांपैकीं अनेकांचा नंतर पडताळा मिळून त्या आज खऱ्या ठरल्या आहेत. ह्या पडताळयांचीं पुष्कळ उदाहरणें प्रस्तुत पुस्तकांतील पूर्वींच्या प्रकरणांत आम्ही तपशीलवार रीतीनें दिलेलीं आहेत. हे पडताळे पदार्थ-विज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, खगोलशास्त्र, भूगर्भशास्त्र, प्राचीन इतिहास व राजकारण वगैरे अनेक क्षेत्रांतले आहेत. ह्या पडताळ्यांची संख्या इतकी मोठी आहे कीं काकतालीय न्यायानें त्यांचा उलगडा होऊं शकणार नाहीं. माणसाला सिद्धि मिळवितां येतात, त्या सिद्धींच्या साहाय्यानें त्याला अदृश्य सृष्टीचें संशोधन करतां येतें, आणि या संशोधनांत माणसाला मिळालेलें अंतर्ज्ञान भौतिक, शास्त्रांतील ज्ञानाइतकें खरें व श्रद्धेय असतें असें जेव्हां आपण कबूल करूं तेव्हांच असल्या व इतक्या पडताळयांचा अन्वयार्थ आपणांला लावतां येईल.

याचाच निष्कर्ष असा कीं आपणांला जर धर्मांचें ज्ञान हवें असलें तर आपण ह्या थिऑसफीय संशोधनाची जिज्ञासाबुद्धीनें माहिती करून घेतली पाहिजे. हिंदुधर्मांत (व इतर धर्मांतही) येणाऱ्या अनेक विषयां-संबंधीचें हें संशोधन आहे. या संशोधनांत कांहीं तपशील नवीन आहे. जुन्या काळीं हिंदुधर्मासमोर जे प्रश्न नव्हते, पण आज जे जनमनांत घोळत आहेत त्यांचीं उत्तरें या संशोधनांत मिळण्या-जोगी आहेत. या संशोधनाचा एक नवा प्रकाश हिंदुधर्मावर पडत आहे आणि हिंदुधर्माचे जे आदरणीय आधारग्रंथ आहेत त्यांचा नीट अर्थ लावण्यासही या संशोधनाचा उपयोग होण्याजोगा आहे.[1]

---

१ आश्चर्य हें कीं या संशोधनाची यत्किंचितही माहिती करून न घेतां कित्येक महाराष्ट्रीय विद्वानांनीं त्याची थट्टा मात्र उडविलेली आहे. उदाहरणार्थ,

(टीप पुढील पानावर चालू)

या दिशेनें आपण एक पायरी पुढें जाऊं या. जगांत आज अनेक धर्म आहेत. ते धर्म ज्या विभूतींनीं स्थापले त्या सर्वांनीं आम्हां स्वतःला 'अनुभव' आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. भगवद्-गीतेंत जेव्हां पुनर्जन्माचा प्रश्न निघाला तेव्हां अमुकग्रंथांत पुनर्जन्माचा सिद्धांत दिला आहे व त्या ग्रंथांतला सिद्धांत मी तुला सांगत आहे असें भगवंतांनीं अर्जुनाला म्हटलें नाहीं, तर मला माझ्या पूर्वजन्मांचें 'ज्ञान' आहे असें सांगितलें आहे. ईश्वराचें स्वरूप सर्वव्यापी असतें असें भगवंतांनीं गीतेंत प्रति-पादिलें आहे. पण एकाद्या ग्रंथाचा आधार घेऊन तसें प्रतिपादन त्यांनीं केलेलें नाहीं. त्यांना त्या स्वरूपाचा प्रत्यक्ष परिचय होता. आणि जेव्हां अर्जुनाचें शब्दांनीं समाधान होईना, तेव्हां श्रीकृष्णांनीं विश्वरूप उघडें करून तें अर्जुनाला दाखविलें असें गीतेंत वर्णन आहे. गौतम बुद्ध हे बुद्ध धर्माचे प्रवर्तक होते. आपणांला स्वतःचे पूर्वजन्म आठवत असत असें त्यांनीं भयभेरवसुत्तांत म्हटलेलें आहे.

---

( टीप मागील पानावरून )

श्री. श्रीपाद महादेव माटे यांनीं आपल्या विज्ञानबोधांत (पृ.६९) थिऑसफीवर टीका केली आहे व या संशोधनाची टवाळी करण्याकरितां आपल्या सूर्य-मालेंतील एका आकाशस्थ ग्रहावर आपल्यासारख्याच म्युनिसिपालटया व लोकलबोर्डें आहेत, फक्त तीं आपल्यापेक्षां जास्त आकारमानाचीं आहेत असें चुकीचें व खोटें विधान थिऑसफीय संशोधकांच्या गळयांत बांधलेलें आहे! श्री. माटे यांना अदृश्य सृष्टीच्या संशोधनाचे पडताळे हवे आहेत व ते या पुस्तकांत जागोजाग दिलेले आढळतील. पण अदृश्य सृष्टीचें संशोधन खोटें व वेडगळपणाचें असतें अशी त्यांनीं समजूत करून घेऊन त्याचे पडताळे मिळणें शक्य नाहीं असें अगोदरच ठरविलेलें दिसतें. आगामी काल-खंडांत नुसत्या भोळयाभावाच्या अथवा नुसत्या अभिमानाच्या पायावर धर्माची इमारत उभी राहूं शकणार नाहीं व धर्माच्या क्षेत्रांत जर सत्यज्ञान खरोखरी नसेल तर धर्म ही एक अफूची गोळी आहे असें म्हणणें प्राप्त होई हें थिऑसफीय संशोधनाची कुचेष्टा करणाऱ्या विद्वानांनीं बिसरतां कामा नये

गयेस बोधिवृक्षाखालीं बसून मनाच्या एका उच्च स्थितींत ते गेले होते, त्या वेळीं त्यांना श्रेष्ठ दर्जाचें अंतर्ज्ञान मिळालें व तो अनुभव प्राप्त झाल्यावरच ते सर्वांना धर्मोपदेश करूं लागले हें त्यांच्या चरित्रावरून दिसतें. महंमद पैगंबर, जीजस् ख्राइस्ट, झोरोॲस्टर महावीर वगैरे धर्मसंस्थापकांचीं चरित्रें वाचलीं, तर ते नुसते पढीक विद्वान् होते असें दिसत नाहीं; तर त्यांना उच्च प्रकारच्या सिद्धी प्राप्त झालेल्या होत्या, त्यांचा 'समाधि' नामक उच्च ज्ञानस्थितीशीं प्रत्यक्ष परिचय होता, त्या स्थितींत जाऊन ते अंतर्ज्ञान मिळवीत असत हें स्पष्ट होतें. थिऑसफिकल सोसायटीचे पुढारी जर सिद्धि मिळवून अदृश्य सृष्टीचें संशोधन करूं शकतात, आणि अशा रीतीनें मिळविलेलें अंतर्ज्ञान जर खरें व श्रद्धेय असतें, तर त्या पुढाऱ्यांच्या पेक्षां श्रीकृष्ण, शंकराचार्य, व्यास, बुद्ध, ख्राईस्ट वगैरेसारखे अनेक पटींनीं श्रेष्ठ असे जे पुरुष जगांतील सर्व धर्मांत होऊन गेले, त्यांनाही उच्च दर्जाचें अंतर्ज्ञान मिळविण्याचें सामर्थ्य होतें व तें ज्ञान खरें आहे असें मानणें ओघानेंच येतें. जेव्हां असले ऋषितुल्य अंतर्ज्ञानी पुरुष मला अपरोक्षानुभूति आहे असें म्हणत व जेव्हां ते कित्येक सिद्धांत जनतेला शिकवीत, तेव्हां तीं त्यांचीं 'मतें' आहेत असें म्हणणें म्हणजे गैरसमज उत्पन्न करणें होय. जुने शब्द योजावयाचे असले तर त्या सिद्धातांना ज्ञान, अंतर्ज्ञान, अनुभूति अशीं नांवें द्यावीं लागतील व अलीकडचा शब्द निवडावयाचा असला तर त्या सिद्धातांना 'अदृश्य सृष्टीचें संशोधन' असें म्हणावें लागेल.

## सर्व धर्मांचे सिद्धांत एकच

सर्व धर्मांचे मूलसिद्धांत एकच आहेत याचें हेंच कारण आहे.[1] दहा माणसांनीं आपल्या तोंडांत साखर घातली तर ती गोड आहे

१. सर्व धर्मांचे मूळ सिद्धांत एकच आहेत. असें जेव्हां आम्ही म्हणतों तेव्हां धर्म या शब्दांत आम्ही रूढि, शिष्टाचार परंपरागत आलेल्या चालीरीति यांचा समावेश करीत नाहीं. या गोष्टी कधीं चांगल्या असतात, कधीं वाईट असतात.

 (टीप पुढील पानावर चालू)

हा एकच अनुभव सर्वांना येतो. सर्वजगभर रसायनशास्त्राची आजची शिकवण एकच आहे. ऑक्सिजनचे गुणधर्म काय असतात व पाण्याचें पृथक्करण केल्यास कोणते दोन वायू त्यांतून निघतात याची माहिती नाना देशांत एकच आहे. कारण ती संशोधनावर आधारलेली आहे. ही माहिती इंग्लंडांतील रसायनशास्त्रज्ञ इंग्रजी भाषेंत लिहील, जर्मनींतील रसायनशास्त्रज्ञ जर्मन भाषेंत लिहील, आणि पुण्याचा रसायनशास्त्रज्ञ मराठी भाषेंत लिहील. इतकाच त्यांत भेद होईल.

'धर्म' हा संशोधनावर आधारलेला असल्यामुळें सर्व धर्मांची तत्त्वें एकच असावयाचीं हें उघड आहे.[1] माणसाला देहावेगळा

---

( टीप मागील पानावरून )

पण त्यांचा धर्माशीं खरोखरीं संबंध नसतो. या गोष्टी एका धर्मातही सर्वत्र सारख्या असतात असें नाहीं. धर्म या शब्दांत आम्हीं वेगवेगळ्या विधिसंस्कारांचाही समावेश करीत नाहीं. उपासना, श्राद्ध वगैरे संस्कार सर्व धर्मांत आहेत. त्यांतील मुद्दा एकच असला तरी विशिष्ट कारणांमुळें त्या संस्कारांची वेगळी मांडणी केलेली असते. प्रत्येक धर्माची अवनति होऊन त्यांत अन्यायाच्या व वेडगळपणाच्या पुष्कळ गोष्टीही शिरलेल्या असतात. 'धर्म' या शब्दांत आम्ही त्याचाही समावेश केलेला नाहीं. धर्मांतील ज्ञान जिज्ञासूला समजून देण्याकरितां कधीं कधीं धर्मांत वैचारिक चौकटी दिलेल्या असतात. त्यांत निरनिराळ्या उपपत्ति असतात. असल्या चौकटींच्या साह्यानें माणसाला कित्येक मुद्दे आकलन करणें सुलभ होतें. न्यायदर्शन, सांख्यदर्शन वगैरे चौकटी हिंदुधर्मांत दिलेल्या आहेत. त्या मुख्यतः अनुभवावर आधारलेल्या नाहींत, बुद्धीला विषय पटवून देण्यासाठीं प्रत्येकींत वेगळी तर्कप्रधान मांडणी आहे. त्यांचाही समावेश येथील 'धर्म' या शब्दांत आम्ही केलेला नाहीं. सर्व धर्मांचे मूल सिद्धांत एकच आहेत या आमच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, सर्व धर्मांतील ज्ञानमूलक गोष्टी एकच आहेत व त्यागोष्टींपासून निघणारे वागण्याचे नियमही एकच आहेत.

१ जगांतील धर्मांत अतिशय साम्य असल्याचा धर्मग्रंथांचा पुरावा डॉ. बेझंटकृत The Universal Text-Book of Religion and Morals व डॉ. भगवान्दासकृत The Essential Unity of All Religions या पुस्तकांत आमच्या वाचकांस मिळूं शकेल.

जीव असतो, देह मेला तरी जीव मरत नाहीं असें जगांतील सर्व धर्म शिकवितात. मरणोत्तर चांगला माणूस चांगल्या स्थितींत जातो व वाईट माणूस दुःख भोगतो असें सर्व धर्मांचें सांगणें आहे. माणसाला एकच देह नसून अनेक देह असतात आणि सृष्टींतही एकच दृश्य लोक नसून अनेक अदृश्य लोक असतात. याबाबत सर्वच धर्मांची शिकवण एक आहे. माणसानें वाईट वर्तन केलें, तर त्याच्या वांटयास दुःख येतें आणि चांगलें वर्तन केलें तर त्याच्या वांटयास सुख येतें हा मुद्दा सर्व धर्मांनीं आपापल्या अनुयायांना शिकविला आहे. अखिल सृष्टीच्या पाठीमागें त्या सृष्टीचें यंत्र चालविणारी एक ज्ञानगर्भ प्रचंड शक्ति आहे, ही शिकवण ह्या ना त्या शब्दांनीं सर्व धर्मांनीं आपल्या अनुयायांसमोर ठेवलेली आहे. परोपकार करावा त्यांत सदाचार आहे, तें पुण्य आहे, दुसऱ्यास पीडा देऊं नये, तो दुराचार आहे, तें पाप आहे, ही शिकवणही सर्व धर्मांत समान आहे. उपासना. प्रार्थना, ध्यान-धारणा, धार्मिक विधिसंस्कार या उपयुक्त गोष्टी आहेत, हें सर्व धर्मांचें म्हणणें आहे. माणसानें प्रयत्न केला तर त्याची प्रगति होऊन तो हळूहळू ईश्वरासमान बनतो व एक उच्चपद गांठू शकतो हा सिद्धांतही सर्व धर्मांत आलेला आहे. अदृश्य सृष्टींत निरनिराळ्या अधिकाराच्या देवदेवता असतात ही गोष्टही सगळ्या धर्मांत नमूद आहे. माणूस पुनः पुनः जन्मास येऊन त्याची प्रगति होत असते असें जगांतले सर्व धर्म सांगतात.[१]

---

१ ख्रिस्ती धर्मांत पुजर्जन्मवाद आज प्रचलित नाहीं. पण पूर्वी तो प्रचलित होता. पुनर्जन्मास मान्यता देणारीं ख्रिस्ती धर्मांतील वचनें डॉ. बेझंट यांच्या The Universal Text-Book of Religion and Morals व डॉ. पास्कल यांच्या Recarnation-a study in Human Evolution या पुस्तकांत दिलेलीं आहेत. इतिहासावरून असें दिसतें कीं प्रारंभीं ख्रिस्ती धर्मांत पुनर्जन्मवाद होता, पण पुढें राजकीय व धार्मिक वैमनस्यें माजून

(टीप पुढील पानावर चालू)

निरनिराळ्या धर्मांत हें साम्य कोठून आलें ? धर्म हा संशोधनावर आधारलेला आहे, मतांवर आधारलेला नाहीं यामुळें जगांतील धर्मांत हें साम्य आलेलें आहे. जगांत कोठेंही जा आणि कोणत्याही क्षेत्राची चौकशी करा, त्यांत संशोधन असलें तर तें भिन्न प्रकारचें असूं शकणार नाहीं. अन्य शब्दांनीं हा मुद्दा सांगावयाचा झाला तर असें म्हणावें लागेल कीं जगांत मूलतः धर्म एकच आहे, तो श्रीकृष्णांनीं संस्कृत भाषेंत सांगितला कीं आपण त्याला हिंदुधर्म म्हणतों, बुद्धांनीं पाली भाषेंत सांगितला कीं आपण त्याला बुद्धधर्म असें नांव देतों आणि ख्राइस्टनीं अरमाईक भाषेंत जनतेला शिकविला कीं जग त्याला ख्रिस्ती धर्म असें म्हणतें. हे सारे धर्म संशोधनावर आधारलेले आहेत आणि म्हणून (आज जरी त्यांत कितीही वेडगळपणा शिरलेला आढळला तरी) मूलतः सर्वच खरे आहेत.

नव्या युगांत जर आपणांला धर्माधर्मांतील वैमनस्यें व भांडणें मोडावयाचीं असतील तर सर्व धर्मांकडे पहाण्याची ही दृष्टि आपण जनतेला शिकविली पाहिजे.

---

(टीप मागील पानावरून)

पुनर्जन्माच्या सिद्धांताची धर्मांतून हकालपट्टी करण्यांत आली व त्यामुळें आज ख्रिस्ती धर्मांत तो सांपडत नाहीं. या भांडणांची कांहीं माहिती E. D. Walker कृत Re-incarnation या पुस्तकांत सांपडेल. लोकांनीं पुनर्जन्म मानतां कामा नये असा निषेधाचा हुकूम इ. स. ५५३ मध्यें एका धर्मसभेनें काढला होता. तो Tibet's Great Yogi Milarepa translated from Tibetan by Lama Kazi Dawa-Samdup edited by W. Y. Evans Wentz या पुस्तकांत पृ. ११ वर दिलेला आहे.

मुसलमानी धर्मांतही सध्यां पुनर्जन्माचा सिद्धांत प्रचलित नाहीं. पण पूर्वी तो होता असें दिसतें. पुनर्जन्मवाद सांगणारीं वचनें पवित्र कुराणांत व इतर मुसलमानी ग्रंथांत आहेत. तीं वर उल्लेखिलेल्या डॉ. बेझंट यांच्या पुस्तकांत व नादरबेग के. मिरझा या मुसलमान ग्रंथकाराच्या Re-incarnation and Islam या पुस्तकांत दिलेलीं आहेत.